# उल्हास-कथा

पुस्तक घेर आटे गो. का

[illegible] ते आमला का

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.

प्रकाशक
कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणें २

# पुरुषस्य भाग्यम्

त्याचं खरं नांव होतं ' अनंत ', पण तो ज्या वर्तमानपत्राच्या कचेरींत नोकरीला होता, तिथले सारे लोक त्याला ' स्वामी ' म्हणून हांक मारीत.

त्याचं हें टोपणनांव पडायचं कारण असं नव्हे, कीं तो गुळगुळीत हजामत करवीत असे; किंवा असंही नव्हे, कीं भगव्या रंगाचे कपडे घालायचा त्याचा परिपाठ होता; किंवा असंहि नव्हे, कीं त्याची वर्तणूक अगदीं शुचिर्भूत सनातनी छापाची होती. त्या टोपणनांवाचं कारण एवढंच होतं कीं, त्याला स्त्रियांच्याबद्दल विलक्षण तिरस्कार होता—किंवा खरं म्हणजे विलक्षण भीति होती; आणि स्त्रियांचा संपर्क तो अगदीं कसोशीनं टाळीत असे. त्यानं कॉलेजांत चार वर्षं घालविलीं होतीं, पण त्या चार वर्षांत तो एकदांसुद्धां विद्यार्थिनींच्या खोलीकडे किंवा त्या खोलीसमोर असलेल्या गॅलरीकडे फिरकला नव्हता. विद्यार्थिनींचं वारंसुद्धां अंगावरून जायला नको म्हणून, जरी त्याची दृष्टि अधू होती आणि प्रोफेसरनं फळ्यावर लिहिलेला मजकूर लांबून वाचायला जरी त्याला अडचण पडत

असे, तरीसुद्धां वर्गाच्या पश्चिम बाजूच्या अगदीं शेवटच्या बांकावर तो बसत असे. एकदां कॉलेजांतल्या निवडणुकीच्या धामधुमींत एका मुलातर्फे मताची मागणी करायला एक विद्यार्थिनी त्याच्याजवळ आली, तेव्हां तो इतक्या वेगानं तिच्यापुढून पळाला होता, कीं त्याचा तो वेग पाहून, पळण्याच्या सगळ्या शर्यती नेहमीं जिंकणाऱ्या विद्यार्थ्याला, आपल्याला प्रतिस्पर्धी निर्माण झाला कीं काय असं भय वाटलं होतं; आणि अनंता जो पळाला होता, तो निवडणुकी होऊन जाईपर्यंत पुन्हा कॉलेजांत गेला नव्हता. गणिताच्या वर्गांत मुलींचं भय कमी म्हणून, त्या विषयाची आवड नसतांनाहि त्यानं बी. ए. साठीं ऐच्छिक विषय म्हणून तो घेतला होता. स्त्रियांचा संपर्क टाळण्याच्या त्याच्या या कटाक्षावरूनच एका विनोदी विद्यार्थ्यानं त्याचं ‘ कार्तिकस्वामी ’ असं नांव ठेवलं होतं. या नांवाचंच ‘ स्वामी ’ असं छोटं सुटसुटीत स्वरूप पुढं झालं होतं, आणि तो ज्या वर्तमानपत्रांत नोकरीस राहिला तिथं त्याचा कॉलेजांतला एक सहाध्यायीहि नोकरीस असल्यामुळं लोक त्याला ‘ स्वामी, स्वामी ’ म्हणूं लागले होते.

अनंताच्या मनांतील स्त्रियांच्याविषयींची भीति उपजत होती, कीं अनुभवसिद्ध होती, याचा विचार केला तर ती अनुभवसिद्ध होती, असंच म्हणावं लागेल. त्याच्या आतांपर्यंतच्या आयुष्यांत त्याला विशेष अनुभव असा तीनच स्त्रियांचा आला होता. एक लहानपणीं त्याच्या सावत्र आईचा, नंतर कॉलेजांत असतांना ज्या खाणावळींत तो कांहीं दिवस दुसरी बरी खाणावळ नसल्यामुळं नाइलाजानं जेवत असे तिच्या मालकिणीचा, आणि नंतर आतां पगार थोडा असल्यामुळें कुणाच्या तरी आश्रयानं राहिलेलं बरं म्हणून ज्या चुलत चुलत बहिणीच्या घरीं तो रहात असे तिचा. सावत्र आईचा छळ त्याला इतका सोसावा लागला होता, कीं तो सोसून सोसून स्त्रियांची जात म्हणजे राक्षसिणींची जात अशी त्याची पक्की समजूत झाली होती. स्वतःच्या आईची त्याला कांहींच आठवण नव्हती; पण ज्या अर्थी आपल्याला अशा छळांत टाकून ती गेली, त्या अर्थी ती सुद्धां दुष्टच असली पाहिजे, असं त्याच्या

बालमनाला अनेक वेळां वाटलं होतं. त्याची सावत्र आई त्याच्या आपाला कसं छळी आणि करकरा वांकवी तें पाहून त्याला पक्कं वाटत गेलं होतं, कीं बायका म्हणजे नवऱ्यावर सुलतानी सत्ता गाजविणाऱ्या निर्दय बेगमा. कॉलेजांत असतांना ज्या खाणावळींत तो जेवत असे, तिची मालकीण आक्कूबाई जरी कुंकू लावत असे तरी विधवा होती हें त्याला समजलं होतं. आणि तिला सत्तेचा असा जरी नवरा नसला तरी खाणावळींत ज्ञात अगर अज्ञात कारणांनीं येणाऱ्या अनेक पुरुषांवर एखाद्या राणीसारखी ती कसा अंमल चालवी तें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलं होतं. कॉलेजांतले विद्यार्थी येवढे टारगटपणांत मी मी म्हणणारे. पण आक्कूबाईचीं फटकळ उत्तरं मिळालीं कीं तेसुद्धां गप्प बसायचे, हें त्यानं पाहिलं होतं. आणि आतां ‘ सुप्रभात ’ नांवाच्या वर्तमानपत्रांत नोकरी धरल्यानंतर आपली चुलत चुलत बहीण अंबूताई हिच्या घरांत राहूं लागल्यावर तिचं स्वरूप त्याला दिसलं तेंहि अतिशय उग्रच. तिचा नवरा कस्टम खात्यांत नोकरीला होता. त्याला पैसे मागून मागून ती नेहमीं हैराण करी, आणि ते त्याला देतां आले नाहींत कीं तोंडाचा पट्टा असा सुरू करी, कीं तो ऐकतच रहावा !

अशा प्रकारें एका विशिष्ट प्रकारच्या स्वभावाच्याच स्त्रियांचा अनुभव अनंताला मिळत गेला होता, व त्यामुळं स्त्रीजातीची त्यानं पक्की धास्ती घेतली होती. या धास्तीच्या जोडीला इतरहि अनेक प्रकारच्या धास्ती त्याच्या मनांत होत्या. ‘ सुप्रभात ’ ची काळरात्र केव्हां येऊन ठेपेल व आपली नोकरी केव्हां सुटेल त्याचा नेम नाहीं असं त्याला नेहेमीं भय वाटे. फूटपाथवरून पाय घसरून माणूस पडण्याचा संभव केव्हांहि आहे, या भयानं तो सदा अगदीं जपून चाले. हिंदु-मुसलमानांचे दंगे चालू असोत अगर नसोत, पठाणाचं भय मुंबईतल्या कोणत्याहि जीवाला वाटत नसेल इतकं त्याला वाटत असे. किंबहुना अनंताकडे पहातांच हा एक धास्तावलेला गरीब दुबळा प्राणी आहे, असंच चटकन् कुणाच्याहि मनांत येण्यासारखं होतं.

त्याचा तो गबाळग्रंथी सूट, नेहमीं खालीं घातलेली मान, [illegible]

जाड भिंगांमागं लपलेली भित्री नजर, कशीबशी लोंबकळत हातीं धर-लेली छत्री, विंचरल्यावांचून अव्यवस्थित ठेवलेल्या केसांच्या, कपाळा-वरून जवळजवळ चष्म्यापर्यंत डोकावणाऱ्या बटा, इत्यादि गोष्टी पाहिल्या कीं, दुबळ्या भित्रेपणाचं मूर्तिमंत चित्र आपण पहात आहोंत असं पहा-णाराच्या मनांत येई.

रोज बरोबर अकरा वाजतां 'सुप्रभात'च्या अंधाऱ्या कचेरींत तो शिरत असे, व 'या स्वामी! या स्वामी!' असं चेष्टेनं स्वागत करणाऱ्या सहकाऱ्यांकडे आपल्या भित्र्या दृष्टीचे कटाक्ष कसेबसे टाकून आपल्या जागीं जाऊन बसत असे. असोसिएटेड प्रेसच्या व इतर तारांचा ढीग आपल्या टेबलावर पडलेला असेल व साऱ्यांची भाषांतरं आपल्याला शक्य तितक्या कमी वेळांत लिहून काढलीं पाहिजेत या जाणिवेनं घाबरलेल्या त्याच्या जीवाला कुणाशीं बोलण्याची उसंत नसावी हें साहाजिकच होतं.

आज तर त्याला तशी उसंत यत्किंचित्‌हि नव्हती. चिनी-जपानी युद्ध सुरू झाल्यापासून त्याच्या टेबलावरच्या तारांचा ढीग रोजच्या रोज वाढत चालला होता. आणि त्या तारांतलीं 'कियाटिंग,' 'शांग्वापांग,' 'पावशान' इत्यादि गांवांचीं आणि चिनी व जपानी सेनापतींचीं आणि मुत्सद्यांचीं चमत्कारिक नांवं शुद्ध नागरी लिपींत लिहून काढतां काढतां त्याचा जीव हैराण होत चालला होता. एकदां तर त्याच्या मनांत आलं होतं, कीं या वाकड्यातिकड्या नांवांशीं झगडण्यापेक्षा चीनमधल्या एकाद्या शहरीं प्रत्यक्ष युद्धांत आपण सांपडलों असतों तर आपला जीव कदाचित् अधिक सुरक्षित राहिला असता! आपली छत्री अधांतरीं लोंबकळत धरून कचेरीच्या दारापासून आपल्या टेबलापर्यंतची वाट चालून जातांना आज तो आपल्या मनाशीं म्हणत होता, 'तारांच्या भेंडोळ्यांत लपलेल्या कोणकोणत्या भेसूर चिनी-जपानी योद्ध्यांशीं आज आपली गांठ पडते आहे कुणास ठाऊक!'

त्यानं आपली छत्री चाळवून उजव्या खांद्यावर आडवी टेवली. जणूं

ती बंदूकच होती ! आणि जणूं पायपिंग शहरांतल्या रणधुमाळींत सामील व्हायलाच तो निघाला होता !

पण तो आपल्या जागेवर येऊन पहातो तों काय आश्चर्य !

आज एकही तार त्याच्या टेबलावर नव्हती. मग भेंडोळं तर बाजूलाच राहिलं. चिनी-जपानी युद्ध थांबलं कीं काय, असा आनंददायक विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. ती बातमी कचेरींतल्या साऱ्या मंडळींना ओरडून सांगावी असंही त्याच्या मनांत आलं. पण तितक्यांत टेबलावर एका फुटक्या पेपरवेटखालीं ठेवलेली एक चिठ्ठी त्याला दिसली. चिठ्ठी उघडीच होती व खालीं संपादकाची सही होती. म्हणून युद्ध संपल्याची वार्ता आपल्या सहकाऱ्यांना सांगण्याचा विचार रद्द करून त्यानं ती उचलून वाचली—

" कचेरींत आल्याबरोबर प्रथम मला भेटा. "

तो तडक संपादकाच्या खोलींत—म्हणजे मोडक्या तोडक्या पार्टिशनांनीं बंद केलेल्या जागेंत—गेला. . . .

संपादकांनीं त्याच्याकडे पाहिलं आणि म्हटलं,

" या स्वामी. हें पहा, तारांचीं भाषांतरं करण्याचं काम आज मीं त्या कुरकुऱ्यांच्याकडे सोंपविलं आहे, तुमची दुसऱ्याच एका कामावर नेमणूक करणार आहें. कराल कीं नाहीं मी सांगेन तें काम ? "

चिनी गांवांचीं आणि माणसांचीं नांवं मराठींत लिहिण्यापेक्षां दुसरं कोणतंहि काम अधिक सोपं आणि सुखाचं असणारच या कल्पनेनं अनंता म्हणाला, ' हो, करीन कीं. "

मोठमोठ्या लोकांच्या मुलाखती घ्यायचं काम आपल्या एकबोट्यांकडे असतं हें तुम्हांला माहीत आहे. पण ते आहेत आज रजेवर; अन् एका प्रसिद्ध व्यक्तीची मुलाखत घ्यायची 'अपॉइंटमेंट' तर मी आज करून बसलों आहें. तेव्हां ती मुलाखत घ्यायला तुम्हांला धाडायचा बेत आहे. माझा. जाल कीं नाहीं ? "

" हो, जाईन कीं. कुणाची मुलाखत घ्यायची ? "

" त्राटिकाबाई कोलते हें नांव तुम्हीं ऐकलं आहेत का नाहीं ? "

"अं...नाहीं."

"काय ? त्राटिकाबाईचं नांव तुम्हांला ऐकून माहीत नाहीं ! अहो, 'जुलुमाचा रामराम,' 'नासलेलं पाणी,' आणखी 'उरांतले उसासे' या त्यांच्या कादंबऱ्यांनीं साऱ्या महाराष्ट्रांत कोण खळबळ उडवून दिलेली आहे आजकाल ! अन् तुम्हांला त्यांचं नांवहि माहीत नाहीं ! धिक्कार असो तुम्हांला !"

अनंतानं मुकाट्यानं खालीं मान घालून तो धिक्कार सहन केला.

संपादक पुढं म्हणाले,

"बरं, कांहीं हरकत नाहीं. एखाद्या लेखिकेची मुलाखत घ्यायची म्हणजे तिचं लेखन अगर नांव माहीत असलंच पाहिजे असं कोण लेकाचा म्हणतो ! मी सांगेन तिथं जाऊन तुम्ही त्राटिकाबाईंना भेटलांत म्हणजे झालं. जाल कीं नाहीं ?"

त्राटिकाबाई हें नांव ऐकतांच आणि त्यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्यांचीं नांवं कानीं पडतांच स्त्रीजातीबद्दल आधींच धास्तावलेलं अनंताचं अंतःकरण चांगलंच धडधड वाजायला लागलेलं होतं. मघांशी त्याला वाटलं होतं, चिनी युद्धाच्या बातम्यांचं भाषांतर करण्यापेक्षां अधिक भयंकर असं दुसरं कोणतं काम असूं शकेल ? अन् त्या कल्पनेनं तो बराचसा आनंदित झाला होता. परंतु संपादक आपल्याला कोणत्या कामावर पाठविण्याच्या बेतांत आहेत हें कळतांच त्याच्या त्या आनंदाचं एकदम उध्वस्त 'शांघाय' शहर होऊन गेलं होतं. 'उरांतले उसासे' लिहिणाऱ्या त्राटिकाबाईची मुलाखत घेण्यापेक्षां जपानी सेनापतीवर गुप्त हल्ला करून त्याला गारद करायची कामगिरी संपादक आपल्याला कां सांगत नाहींत, असं त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलं नाहीं.

"जाल कीं नाहीं ?" असं जेव्हां संपादकांनीं त्याला पुन्हा विचारलं, तेव्हां तो आपल्या कष्टी विचारांतून जागा झाला, आणि नकार दिला तर नोकरी जाईल असा सुविचार करून झटकन् पुटपुटला,

"अं...हो, जाईन कीं."

" ठीक. हा त्यांचा पत्ता लिहून घ्या. त्राटिकाबाई कोल्ते, चण्डिका-सदन, व्हिन्सेंट रोड, दादर. बरोबर पांच वाजतां त्यांच्या• बंगल्यावर जायला पाहिजे हं. चार वाजतां त्यांना कुठल्याशा मीटिंगला जायचं आहे. तिकडून पांच वाजतां त्या घरीं येणार आहेत. अन् त्या वेळेस 'सुप्रभात'च्या प्रतिनिधीला मुलाखत द्यायचं त्यांनीं कबूल केलं आहे. वेळ चुकवूं नका. वाटलं तर बसनं जा. त्यांच्या बंगल्यापुढंच बस उभी रहाते. येतांना मात्र ट्रॅमनं या हं. हे घ्या आठ आणे. यांत तुमचा चहा-सुद्धां भागायला हरकत नाहीं. मुलाखत अगदीं उत्तम झाली पाहिजे, लक्षांत ठेवा. "

अनंतानं मान हालविली, टेबलावरची अधेली उचलली आणि तो निघाला.

पण संपादकांनीं त्याला परत फिरायला लावून विचारलं,

" मुलाखतींत काय काय प्रश्न विचाराल त्राटिकाबाईंना ? "

अनंतानं गोंधळून उत्तर दिलं, . . .

" अं...आतां ठरवतों जाण्यापूर्वी. "

" तें लिहून काढा नीट अन् मला दाखवा. नाहींतर हें पहा, असं करा. मीच सांगतों तुम्हांला कोणते प्रश्न त्राटिकाबाईंना विचारायचे ते. घ्या लिहून. "

अनंतानं लिहून घ्यायला प्रारंभ केला.

" प्रश्न १ ला—आपल्याला अगदीं लहानपणापासून लेखनाची आवड आहे का ?

" प्रश्न २ रा—कादंबरीचं कथानक आपण कसं जुळवितां ?

" प्रश्न ३ रा—आपण आपल्या सर्व कादंबऱ्यांतून ज्या नायिका दाखवल्या आहांत, त्या पुरुषजातीवर अत्यंत चिडलेल्या आहेत. पुरुष म्हटल्याबरोबर त्या पायपोसाखेरीज दुसरं कांहीं काढीतच नाहींत. अशा वृत्तीच्या स्त्रिया आपल्या प्रत्यक्ष पाहण्यांत कितीशा आल्या आहेत ?

" प्रश्न ४ था—आपली लेखनाची नेहमींची वेळ कोणती ?

" प्रश्न ५ वा--आपण स्वतःच सारं लिहितां, कीं तोंडानें मजकूर सांगतां ?

" प्रश्न ६ वा--आतां कोणत्या कादंबरीची जुळवाजुळव आपण करीत आहांत ?

" प्रश्न ७ वा—विवाहसंस्थेबद्दल आपलें काय मत आहे ?

" प्रश्न ८ वा--लेखनाखेरीज आपल्याला कसली कसली आवड आहे ?

" प्रश्न ९ वा—अनोळखी वाचकांकडून आपल्याला खूप पत्रं येतात का ? आणि त्या सर्वांना आपण उत्तरं धाडतां का ?

" प्रश्न १० वा--आपण कोणता स्नो वापरतां ? कोणती पावडर ? कोणतं केंसांचं तेल ? कोणता सुगंध ?

" प्रश्न ११ वा—आपल्याला कोणती नटी अधिक आवडते ? शांता आपटे कीं लीला देसाई ?

संपादयांनीं डोकं खाजवून म्हटलं,

" किती झाले प्रश्न ? "

" अकरा. "

" रगड झाले. अन् हें पहा स्वामी, येवढेच प्रश्न विचारायचे असं नका समजूं हं. आयत्या वेळेस रागरंग पाहून तुम्हांला आणखी कांहीं गमतीदार प्रश्न सुचले तर खुशाल विचारायचे. मुलाखत अगदीं चुरचुरीत झाली पाहिजे हें मुख्य धोरण लक्षांत ठेवायचं. मुलाखत घ्यायच्या शास्त्रांतला पहिला सिद्धांत असा, कीं सत्याची अवास्तव चाड बाळगायची नाहीं. अन् दुसरा सिद्धांत सदा लक्षांत ठेवायचा तो असा कीं--"

पण तितक्यांत वाटीसारखी जरीची टोपी डोक्याला घातलेला एक बोहरा जातीचा इसम पार्टिशनचं दार लोटून आंत शिरलेला संपादकांना दिसला; व तो बरेच दिवस थकलेलं कागदाचं बिल वसूल करायला आला असला पाहिजे हें ओळखून संपादकमहाशयांनीं मुलाखतीच्या सिद्धांतांवरच आपलं प्रवचन अर्धच सोडून स्वामीला रजा दिली.

* * * *

बसमधून उतरून ' चण्डिकासदन ' अशी पाटी पाहून एका छोट्याशा टुमदार बंगलीच्या आवारांत शिरतांना, आपखुषीनं कसाईखान्यांत पाऊल टाकणाऱ्या मेंढराची स्थिति आपल्याहून अधिक अनुकंपनीय खचित नसेल, असं अनंताच्या मनांत पुनः पुनः येत होतं !

कुणाहि स्त्रीशीं चार शब्द बोलायचे म्हणजे एक मोठा दारुण प्रसंग असं त्याला नेहमीं वाटत आलं होतं. अन् आतां तर त्याला परक्या स्त्रीशीं चारच शब्द नव्हे, तर चार हजार शब्दांची मुलाखत तयार होईल इतकं बोलायचं होतं ! आणि ती स्त्री कोण ? तर 'नासलेलं पाणी' आणि ' उरांतले उसासे ' अशा पुस्तकांची जननी त्राटिकाबाई !

पण नोकरी संभाळण्यासाठीं त्याला या प्रसंगाला तोंड देणं आवश्यक होतं.

पोटासाठीं मनुष्य वाटेल तें धाडस करील हेंच खरं.

लहानपणीं पाठ केलेल्या ' दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं ' या आरतीचे चरण आठवतील तेवढे आठवीत अनंता बंगलीच्या पायऱ्या चढून वर गेला.

तिथं आसपास त्याला कोणीच दिसेना. दारावर घंटेचं बटन असेल म्हणून त्यानं पाहिलं, तर तेंहि कुठं दिसेना.

भीत भींत पण जरा उंच आवाज करून तो म्हणाला,

" घरांत आहे का कुणी ?"

आंतून ' गुर्रर्र ' असा विचित्र आवाज त्याला ऐकूं आला.

त्यानं डोळे ताणून पाहिलं तो आंतल्या छोट्याशा दिवाणखान्यांत एक भलं जंगी कुत्रं पुढच्या पंजावर डोकं ठेवून निजलं होतं आणि गुरगुरत त्याच्याकडे पहात होतं. त्याचे पिंगट डोळे एखाद्या वाघाच्या डोळ्यासारखे चमकत होते.

अनंताच्या मनांत एकदम आलं, कीं ताबडतोब पलायन करावं. पण नोकरीची चिंता वहाणारं त्याचं मन त्याला म्हणालं, ' असं पळून गेल्या-

वर संपादकांना काय सांगणार ? त्राटिकाबाईच्या कुत्र्याला भिऊन मी पळून आलों म्हणून ?'

थोडंसं धैर्याचं अवसान आणून तो पुन्हा उंच आवाजांत ओरडला,

" घरांत आहे का —"

पण त्याचं वाक्य पुरं व्हायच्या आधींच आंतला तो भला जंगी कुत्रा. मोठ्यांदा भुंकत उठला.

अनंताच्या मनांतला धैर्याचा सारा विवेक एका क्षणांत पार नाहींसा झाला. त्यानं धूम ठोकली.

त्याच्या दृष्टीला पायऱ्या नीट दिसल्या नाहींत. पायऱ्यांपुढच्या रेतींत स्वारी सपशेल पालथी पडली. छत्री एकीकडे, टोपी एकीकडे, हातांतले कागद एकीकडे अशी एखाद्या चिनी सैन्यांतल्या शिपायाप्रमाणं त्याच्या वस्तूंची पांगापांग झाली !

त्यानं कल्पना केली कीं, आतां तो राक्षसी कुत्रा आपल्यावर झडप घालून आपलीं खांडोळीं करणार. आपण मेलों खास ! बरं झालं विम्याचा नवा हप्ता आपण अजून भरला नाहीं. उद्यांच्या साऱ्या वर्तमानपत्रांत— निदान ज्या ' सुप्रभात ' ची आपण इतके दिवस इमानानं नोकरी केली त्यांत तरी मोठ्या टाइपांत आपल्या करुणास्पद मृत्यूची बातमी येणार ! " प्रसिद्ध कादंबरींकर्तीच्या दारांत एका इमानी वार्ताहराचा मृत्यु ! " " मुलाखतीसाठीं प्राणांची पर्वा न करणारा हुतात्मा ! "...

पण काय आश्चर्य ! त्यानं मरणाची तयारी केली असूनहि तो मेला नाहीं !

तो चांडाळ कुत्रा त्याच्याजवळहि आला नाहीं.

मोठमोठ्या घोगऱ्या आवाजांतलं त्याचं भुंकणं चालू होतं; पण त्या भुंकण्याबरोबरच कुणातरी स्त्रीचा आवाज ऐकूं येत होता.

" बॉबी, बॉबी ! गप !...कोण आहे ? कोण पाहिजे हो तुम्हांला ? अहो गृहस्थ, उठा ना. हें काय सूर्यनमस्काराचं प्रॅक्टीस चालवलं आहांत कीं काय ? उठा उठा. कोण पाहिजे तुम्हांला ? "

अनंता उठला आणि कपडे झाडून वर पाहून म्हणाला,

“ आपणच पाहिजेत मला. ”

“ अगदीं सरळ सांगतां आहांत कीं हो. ”

“ नाहीं, म्हणजे आपली मुलाखत पाहिजे आहे. त्राटिकाबाई कोलते आपणच ना ? मुलाखतीसाठीं ‘ अपॉइंटमेंट ’ दिली आहांत आपण ‘ सुप्रभात ’ च्या संपादकांना. त्यांनीं मला धाडलं आहे. ”

तें ऐकतांच कां कुणास ठाऊक, पण ती स्त्री मोठ्या मिस्किलपणानं गालांतल्या गालांत हंसली आणि अनंताला म्हणाली,

“ असं कां ? या या. आंत याना. तो कुत्रा कांहीं करणार नाहीं तुम्हांला. बॉबी, चल चालता हो पाहूं येथून. ”

तिचा तो हुकूम ऐकतांच तो कुत्रा शेपटी खालीं करून नम्रपणानं निघून गेला, आणि त्या स्त्रीच्या मागोमाग अनंता दिवाणखान्यांत शिरला. तोसुद्धां इतक्या नम्रपणानं, कीं त्याला शेपटी असती तर तीसुद्धां खालीं गेलेली दिसली असती.

त्राटिकाबाईकडे अनंतानं चारपांचच चोरटे कटाक्ष टाकले, पण तेवढ्यांत त्यांचं जें स्वरूप त्याला दिसलं, त्यामुळं तो अतिशय आश्चर्यचकित झाला. त्याच्या मनांत आलं, काय या त्राटिकाबाई ? त्यानं कल्पना केली होती त्याप्रमाणं त्या जाडजूड नव्हत्या, बसकट नाकाच्या नव्हत्या, जाड ओठाच्या नव्हत्या आणि त्यांच्या नाकावर जाड भिंगाचा चष्माहि नव्हता. अगदीं तरुण होत्या ! गोऱ्यापान नसल्या तरी चांगल्या देखण्या होत्या. आणि उग्र नसून मोठ्या मोहक होत्या......

अनंता ज्याप्रमाणं त्राटिकाबाईविषयीं मनाशीं विचार करीत होता, त्याप्रमाणंच त्याहि त्याच्याविषयीं विचार करीत असल्या पाहिजेत. कारण, त्याला जरी तें कळत नव्हतं, तरी त्यांची नजर त्याच्याकडे सारखी लागलेली होती. त्याचं भीत भीत बोलणं, प्रशस्त खुर्चीत अंग चोरून बसणं, हातापायांची घाबरट चाळवाचाळव करणं, पुन्हा घसा साफ करणं, हातरुमालाची निरर्थक काढघाल करणं इत्यादि प्रत्येक गोष्ट त्या अगदीं लक्ष-

पूर्वक पहात होत्या. जणूं अशा भेदरलेल्या घाबरट जीवाच्या नमुन्याच्या शोधांतच त्या होत्या. आणि तो नमुना अनंताच्या रूपानं त्यांच्यापुढं अकस्मात् प्रगट झाल्यामुळं त्या तो शक्य तितका पाहून घेत होत्या.

चहा वगैरे झाल्यावर त्या अनंताला म्हणाल्या,

" सिगारेट देऊं का तुम्हांला ? "

" नको नको. " असं अनंता म्हणाला तें अशा आविर्भावानं, कीं जणूं ' द्या ' असं त्यानं म्हटलं असतं तर एका मोठ्या पापाची कबुली दिल्यासारखं झालं असतं.

इतकी धास्तावलेला जीव त्राटिकाबाईंनीं पूर्वी कधीं खचित पाहिला नसेल. किंचित् हास्य करून त्या म्हणाल्या,

" बरं, ठीक आहे. आतां घ्या आमची मुलाखत. काय काय प्रश्न विचारणार आहांत ? "

अनंताला एकदम आठवण झाली, प्रश्नांचा कागद...?

इकडे येतांना वाटेंत आणि बंगल्यांत शिरल्यावरसुद्धां त्यानं तो मोठ्या कटाक्षानं आणि नेकीनं हातांत गच्च धरून टेवला होता. पण तो आतां होता कुठं?

त्याच्या हातांत तर तो नव्हताच, पण कोटाच्या खिशांत त्यानं भराभर हात घालून पाहिला तर तिथंहि त्याला तो सांपडेना.

त्यानं पायऱ्याखालीं साष्टांग नमस्कार घातला त्या वेळेस तो कागद हातांतून उडून गेला असला पाहिजे खास.

या क्षणीं बंगल्याच्या आवारांत कुठं तरी वावडीसारखा तो फडफडत असेल ! पण उठून बाहेर जाऊन तो कागद हस्तगत करून आणणं शक्य नव्हतं.

आतां काय करावं ?

अनंता मोठ्या बुचकळ्यांत पडला.

पण अखेर आपल्या स्मरणशक्तीवर आणि अकलेवर मदार ठेवून प्रसंगांतून निभावून जायचं ठरवून, आणि मनांत उडालेला विलक्षण

गोंधळ लपविण्यासाठीं विचित्र हास्य करून तो म्हणाला,·

" अं...हो, बरेच प्रश्न विचारणार आहे. मात्र आपण मला जरा संभाळून घेतलं पाहिजे. कारण, मुलाखत घ्यायची माझी ही पहिलीच खेप आहे. "

त्राटिकाबाई पुन्हा मघांसारख्या गालांतल्या गालांत मिस्किलपणानं हंसल्या आणि म्हणाल्या,

" माझीसुद्धां मुलाखत द्यायची ही पहिलीच खेप आहे असं समजा म्हणजे झालं हो. हं, विचारा तुम्हांला काय विचारायचं आहे तें. पहिला प्रश्न काय आहे तुमचा ? "

अनंतानं जिवाचा धडा करून म्हटलं,

" अं...आपण लिहायला केव्हां लागलांत ? अगदीं लहानपणीं का ?"

" तर ! अहो, मला लिहितां यायला लागलं तेव्हां मी सारी पांच वर्षांची होतें. "

" कादंबरीचं कथानक आपण कसं जुळवितां ? "

" अहो, त्यांत काय अवघड आहे ? नुसता पोरखेळ आहे तो. चारसहा पात्रं घ्यायचीं. त्यांना कधीं दिवाणखान्यांत, कधीं सैंपाकघरांत असं निरनिराळ्या जागीं बसायला लावून वाटेल त्या विषयावर बोलायला लावून त्यांच्या तोंडांत सणसणीत शिव्या घातल्या कीं आमचे मराठी वाचक विचारप्रवर्तक कादंबरी म्हणून त्या लिखाणाचं स्वागत करायला तयार आहेत. "

" आपली लेखनाची नेहमींची वेळ कोणती ? "

" जीव कशानं तरी कातावलेला असला म्हणजे मी लिहायला बसतें. कारण मग साहजिकपणेंच अगदीं शंभर नंबरी जहाल लिखाण लेखणींतून बाहेर पडतं. "

" आपण स्वतःच सारं लिहितां कीं—"

" मी माझ्या हातानं अजूनपर्यंत एकहि कादंबरी लिहिली नाहीं.

" लेखनाखेरीज आपल्याला कसली कसली आवड आहे ? "

" लेखनाचीच काय ती नाहीं. बाकी सगळ्या गोष्टींची आवड आहे." तितक्यांत अनंताला आठवलं, कीं संपादकांनीं सांगितलेल्या यादींत विवाहाबद्दलचा कांहींतरी प्रश्न होता. म्हणून त्यानं विचारलं,

" आपण विवाह करायला तयार आहांत का ? "

त्राटिकाबाई एकम मोठमोठ्यानं हंसून म्हणाल्या,

" म्हणजे ! अहो, तुम्ही मुलाखत घ्यायला आलांत कीं मागणी घालायला आलांत ! "

" माफ करा हं. असले प्रश्न विचारण्याचं प्रॅक्टिस नाहीं मला. पण आपणांसारख्या प्रसिद्ध लेखिकेच्या विवाहाबद्दल आपले हजारों वाचक उत्सुक असणार. अशा हिशोबानं तो प्रश्न—"

त्राटिकाबाई पुन्हा हंसल्या व म्हणाल्या,

" जाऊं द्या तो प्रश्न. पुढचा विचारा. "

संपादकांनीं टिपून दिलेल्या प्रश्नांची शक्य तितक्या झटपट आठवण करून अनंतानं विचारलं,

" आपण केंसाला कोणती पॉवडर लावतां अन् तोंडाला कोणतं तेल–"

" तोंडाला तेल ! आतां मात्र तोंडाला येईल तें तुम्ही बोलायला लागलांत हो ! आतां तुम्ही मुलाखत आटपावी हें चांगलं. झाली येवढी मुलाखत पुरे झाली कीं. नाहीं का ! "

असं म्हणून हंसत हंसत त्राटिकाबाई उठल्या.

अनंता समजला कीं आपल्याला जाण्याचीच ही सूचना आहे. कागदांची घडी करून खिशांत घालीत आणि फाउंटन् पेन बंद करून वरच्या खिशाला खोंवीत तो उठून उभा राहिला आणि नमस्कार करून म्हणाला,

" बरं येतों. मुलाखतीची कृपा आपण केलीत याबद्दल मी आपला फार फार आभारी आहें. "

त्राटिकाबाई पुन्हा गालांतल्या गालांत मिस्किलपणानं हंसून म्हणाल्या,

" छे छे ! तुम्हांला लवकरच कळून येईल कीं, या मुलाखतीबद्दल

मींच तुमचे आभार मानले पाहिजेत."

"छे छे, असं कसं म्हणतां आपण!"

असं पुटपुटून आणि हस्तिदंती करून अनंता दरवाजाकडे जाऊं लागला. पण दोनचार पावलं टाकल्यावर मधेंच थबकून त्यानं विचारलं,

"कुत्रा मोकळा नाहीं ना?"

"नाहीं नाहीं, तुम्ही अगदीं निर्धास्तपणानं जा."

असं म्हणून त्राटिकाबाई मोठमोठ्यानं हंसल्या.

* * * *

अनंता बसमधें बसून आपल्या मार्गाला लागला असेल नसेल तोंच 'चण्डिकासदना' पुढं एक गाडी उभी राहिली, व तिच्यांतून एक बाई बाहेर पडल्या. या बाई खूप उंच आणि कृश होत्या. त्या बरंचसं कुबड काढून चालत होत्या. त्यांच्या केंसांचा अंबाडा लहानशा आंब्याएवढासुद्धां नव्हता. ओंठ जाड होते. दांत पुढं होते. चष्म्याचीं भिंगं मोठालीं होतीं. डोळे बारीक होते. ओंठांवर थोडीशी लवसुद्धां होती!

त्या सरळ पायऱ्या चढून वर गेल्या. दिवाणखान्यांत शिरल्याबरोबर त्यांनीं विचारलं,

"तारे, माझ्याकडे कुणी येऊन गेलं का ग? अग, हंसतेस काय? कुणी येऊन गेलं का माझ्याकडे? मी त्या सुप्रभातच्या संपादकांना 'अपॉइंटमेंट' दिली होती पांच वाजतांची, अन् मीटिंग तर कांहीं केल्या आटपेना, त्यामुळं झाला उशीर. आलं होतं का कुणी त्यांच्याकडून? सांग ना. अग, नुसती हंसते आहेस काय?"

"साऱ्या आयुष्यांत केली नसेल अशी मीं एक गंमत केली आहे आज. मग हंसूं नको तर काय करूं! आपण एक मोठ्या लेखिका आहांत असा फार गर्व मिरवीत होतीस तूं माझ्याजवळ नाहीं का? फार दिवस माझ्या मनांत होतं तुझी चांगली फजीती करावी असं. आज छान साधलं माझं काम."

असं म्हणून मघांची त्राटिकाबाई म्हणजे खरी तारा मोठमोठ्यानं हंसूं लागली.

खऱ्या त्राटिकाबाई गोंधळून जाऊन तिच्याकडे पहात उभ्या राहिल्या व म्हणाल्या,

" अग, केलं आहेस तरी काय? गंमत करायसाठीं वाटेल तें करशील तूं. तुला ज्या त्या बाबतींत गंमत करावीशी वाटत असते. तूं माझी मावस बहीण आहेस असं कबूल करायचं सुद्धां माझ्या जिवावर येतं पुष्कळदां. माझी फजिती केली आहेस म्हणजे केलं आहेस तरी काय?"

" उद्यां कळेल तुला."

असं म्हणून तारा जिन्याकडे वळून धांवत वर आपल्या खोलीकडे गेली.

ती घाईघाईनें आपल्या लिहिण्याच्या टेबलाजवळ बसली आणि एक पाकीट काढून त्याच्यावर तिनं पुढील पत्ता लिहिला—

" झेड्. तोताराम, डायरेक्टर,
'अफाट सिनेटोन,'
घोडबंदर,
मुंबई"

मग तिनं एक नोटपेपर काढला व पुढील पत्र लिहिलं—

" माझी शंभर टक्के विनोदी स्टोरी तुम्हांला फार पसंत पडली असूनही ती घेण्याच्या बाबतींत तुम्हांला अशी अडचण वाटत होती, कीं मी ज्या तऱ्हेचा धास्तावलेला, घाबरलेला, बावरलेला नायक दाखविला आहे? त्या तऱ्हेचा मनुष्य त्या कामासाठीं कुठून आणायचा? मला कळविण्यास आनंद वाटतो, कीं तुम्हांला वाटणारी ही अडचण दूर झाली आहे. मी ज्या तऱ्हेचा नायक रंगविला आहे, हुबेहुब त्या तऱ्हेचंच एक पात्र माझ्या पाहण्यांत आलं आहे. शक्य तर उद्यांच तुम्हांला दाखवायला आणतें."

* * * *

दुसऱ्या दिवशींच्या 'सुप्रभात'च्या अंकांत त्राटिकाबाई कोलते यांची मुलाखत प्रसिद्ध होतांच साऱ्या वाचकवर्गांत मोठी खळबळ उडाली. सगळ्यांना तो एक विनोदाचा नमुना वाटला आणि ती मुलाखत म्हणजे ज्याच्या त्याच्या हंसण्याचा एक विषय होऊन बसला.

त्राटिकाबाई खूप संतापल्या. तारा पोट धरधरून हंसली. त्यामुळं अधिकच चिडून त्या सरळ ‘ सुप्रभात ’ च्या संपादकांकडे गेल्या, व खरा प्रकार काय घडला होता तें त्यांस सांगून त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित केली पाहिजे असं त्यांस बजावलं.

संपादकाला दिलगिरी प्रदर्शित करण्यांत कधींच दिलगिरी वाटत नाहीं. त्याच्या हातचा मळ असतो तो–किंवा कागदावरची शाई म्हणा वाटलं तर. ‘ सुप्रभात ’ चे संपादक माफी मागून मोकळे झाले.

आणि त्यांनीं स्वामीला ऊर्फ अनंतालाही मोकळं केलं, म्हणजे शिव्यांची लाखोली वाहून नोकरीवरून दूर केलं.

* * * *

यानंतर सुमारें आठ दिवसांनीं एके दिवशीं संध्याकाळीं साडेसहा वाजण्याच्या सुमारास ‘ इम्पीरियल सिनेमा ’ च्या आवारांतल्या एका बांकावर एक व्यक्ति बसली होती. त्या बांकावर दुसरं कुणीच नव्हतं, तरी सुद्धां हा इसम अगदीं अंग चोरून बसल्यासारखा दिसत होता. त्याच्या बुटाला पॉलिश नव्हतं, सुटाला घडी नव्हती, नेक्टायला रंग नव्हता, केंसांना तेलही नव्हतं अन् भांगहि नव्हता, आणि अगदीं शून्य दृष्टीनं तो कुठं तरी पहात होता !

तो अनन्ता होता हें काय निराळं सांगायला पाहिजे ?

बिचारा आतां बेकार झाला होता. आधींच स्त्रियांच्या विषयीं कडवटलेलं त्याचं मन आतां अधिकच कडू झालं होतं. कारण, त्याची नोकरी जायलाहि स्त्रियाच कारण झाल्या होत्या. ‘ सारी स्त्रीजात बेइमानी ’ असं म्हणणाऱ्या हॅम्लेटप्रमाणें ‘ सारी स्त्रीजात भयंकर ’ असं गेले आठ दिवस तो अहोरात्र मनाशीं पुटपुटत होता. सिनेमा पहायला म्हणून तो आला होता, पण स्त्रीजातीच्या भयंकरपणाबद्दल आणि आपल्या करुणास्पद बेकारीबद्दल विचार करीत तो जो बांकावर बसला, तो तिथून उठायचं भान त्याला राहिलं नाहीं.

सिनेमाचा खेळ सुरू होण्याच्या दोन्ही घंटा होऊन गेल्या तरी तो त्या बांकावरच बसून राहिला.

तितक्यांत कोणीसं त्याच्याजवळ येऊन त्याला म्हटलं,

" आपल्याला बोलावलं आहे. "

आपल्या खिन्न विचारांच्या तद्रींतून जागृत होऊन अनन्तानं वर पाहिलं. युनिफॉर्म घातलेला चित्रपटगृहाचा एक नोकर त्याच्यापुढं उभा होता. झोपेंतून उठल्याप्रमाणें करीत अनन्तानं त्याला विचारलं,

" अं ?...काय ?..."

" आपल्याला बोलावलं आहे. "

" कुणीं ? "

" बाईनीं. "

अरे बापरे ! बाईनीं ! आतां कुठली बाई आपल्यावर झडप घालणार ? या जगांतून बायका नाहींशा करतां येणं शक्य नाहीं काय ?...

अनन्ताला वाटलं, आतां एकदम येथून धूम ठोकावी...

पण युनिफॉर्म घातलेला तो नोकर चांगला जाडजूड होता, तो कसचा त्याला पळूं देणार ?......

म्हणून अनन्तानं दीनपणानं विचारलं,

" कोण बाई ? "

" आपण चला म्हणजे आपल्याला कळेल. "

अनन्ता त्या नोकराच्या मागोमाग चालूं लागला.

वरच्या मजल्यावर ऑफिसच्या खिडकींत ताराबाई व झेड् तोताराम त्याच्याकडे दृष्टि लावून गेला अर्धा तास: उभे होते व आतां तो नोकराबरोबर वर येत आहे हें पाहून एकमेकांत हंसत होते, याची अनन्ताला दादही नव्हती.

तो वर ऑफिसांत पोंचतांच ताराबाई हंसत पुढं आली व त्याला म्हणाली,

" या या. तुम्हांला आम्ही किती शोधतों आहोंत आज आठ दिवस ! ' सुप्रभात ' च्या कचेरींत तुम्हांला भेटण्यासाठीं आम्ही गेलों, तों तिथं

तुम्ही भेटलां नाहींत, अन् तुमची गांठ कुठं पडेल तेंहि कुणी सांगेना. तुम्ही आतां कांहीं आम्हांला सांपडत नाहीं अशी निराशा वाटूं लागली होती आम्हांला. पण अखेर आज अचानक सांपडलांत. या, बसा. मला ओळखलंत का नाहीं ?"

खुर्चीवर अंग टाकून कपाळावर हात मारून अनन्ता म्हणाला,

"तुमची ओळख जन्मभर तरी विसरेन का ? त्राटिकाबाईंचा पार्ट करून माझ्या गरिबाच्या नोकरीवर संकट आणणाऱ्या त्या तुम्हीच ना ? तुमचा खेळ झाला पण माझी नोकरी गेली."

त्याचं तें बोलणं, भेदरल्यासारखं बसणं आणि अंगविक्षेप करणं हें सारं पाहून ताराबाई मोठमोठ्यानं हंसल्या व म्हणाल्या,

"अहो, नोकरी गेली तर गेली ! फिकीर कशाला करतां ? मी देतें तुम्हांला नोकरी. अन् लेखणीघाऱ्याची सांठ रुपयांची नाहीं, तर चांगली बड्या पगाराची. किती पाहिजे पगार तुम्हांला ? दोनशें ? अडीचशें ? तीनशें ?......"

अनन्ता मनस्वी गोंधळून गेला. त्याला क्षणभर वाटलं, आपण एखाद्या लिलावांतले सवाल तर ऐकत नाहीं ? अतिशय भांबावलेल्या चेहऱ्यानं तो ताराबाई व तोताराम यांच्याकडे पहात राहिला.

त्याची ती चर्या पाहून तोताराम आनन्दानं एकदम ओरडला,

"बस् बस् बस् ! हाच चेहरा, अगदीं हाच चेहरा मला हवा होता ! ताराबाई, अगदीं आपल्याला हवं तसलं पात्र तुम्हीं शोधून काढलं ! तीनशेंवर भागत नसलं, तर या माणसाला साडेतीनशें पगार द्यायला तयार आहें मी. याला आतां कुठं जाऊं देऊं नका. अगदीं धरून ठेवला पाहिजे."

असं आवेशानं म्हणून झेंड्‌ तोताराम अनंताच्या शेजारच्या खुर्चीवर येऊन बसला ! ठाकूरद्वारच्या देवळांतला काळा राम किंवा गोरा राम जवळ येऊन बसला असता तर अनंताला अधिक आश्चर्य वाटलं नसतं !

तो मनाशीं विचार करूं लागला, "मी स्वप्नांत तर नाहीं ? किंवा एखाद्या अपघातांत सांपडून त्या बेशुद्धींत आपल्या दृष्टीपुढं हें विचित्र दृश्य दिसतं आहे असं तर नाहीं ?..."

पण लवकरच त्याला पुरतं कळून आलं, कीं तो स्वप्नांतहि नव्हता कीं बेसावधहि नव्हता. सुरवंटाचं फुलपांखरूं होतांना तो प्राणी कांहीं काल निपचित पडून रहातो, तशी त्याची अवस्था झाली होती इतकंच. चिनी जपानी युद्धाच्या तारांचीं भाषांतरं करणाऱ्या दुबळ, भित्र्या, धास्तावलेल्या 'स्वामीं'तून त्या क्षणीं एक प्रसिद्ध सिनेमा स्टार जन्माला येत होता !

अनंताचा जो गबाळेपणा, भित्रेपणा आणि दुबळेपणा आजपर्यंत त्याच्या प्रगतीच्या आड आला होता, त्यांतूनच आज अकस्मात् त्याचं भाग्य उदयाला आलं होतं !

'पुरुषस्य भाग्यम्' म्हणतात तें हें असं !

---

# उपाशी प्रेम !  : : १२

नखशिखान्त खादीचा पोषाख करून भावड्या कॉलेजांत आलेला पाहतांच त्या दिवशीं सगळयांना विलक्षण विस्मय वाटला !

भावड्याचा गांधींच्या कुठल्याहि चळवळीवर विश्वास असेल अशी शंकासुद्धां कधीं कुणाला घेतां आली नव्हती. गांधींच्याच कशाला, कोणत्याहि शारीरिक अगर मानसिक चळवळीला भावड्याचा विरोध असायचा हें आतां सर्वांना माहीत झालं होतं अभ्यास, वाचन असल्या मानसिक चळवळी त्याला अगदीं मानवत नसत व त्या फंदांत तो कधीं पडतहि नसे. शारीरिक चळवळ तर त्याला बिलकुल पसंत नसे. क्रिकेट-टेनिससारखे खेळ तर राहोतच, पण मैल दोन मैलांच्या रपेटीचं देखील त्याला अगदां वावडं होतं. निसर्गानं त्याला अशी निकोप प्रकृति दिली होती, कीं प्रकृति उत्तम राखण्यासाठीं व्यायामाची आवश्यकता आहे असा त्याला उपदेश करायची, मॅकफेडन अमेरिकेहून आला, तरी त्याची प्राज्ञा नव्हती ! चेहऱ्यानं अन् शरिरानं निसर्गतःच गरगरीत बाटोळी

होती स्वारी आणि सहजासहजीं, आस्तेकदम, पडल्या पडल्या, बसल्या-बसल्या जेवढं होईल तेवढं करायचं हें त्याचं ब्रीदवाक्य होतं. लढाई झाली तरी अष्टौप्रहर काय वेड्यासारखी करायची ! सूर्य मावळतो आहे वा चंद्र उगवतो आहे अशा गुलाबी घटकेला चार हात करावेत असं प्रतिपादणारा ' मानापमान ' नाटकांतला ' लक्ष्मीधर ' भावड्याला फार आवडत असे. त्यानं आपल्या खोलींत शिवाजी, टिळक असल्या चळवळ्यांचे फोटो लावण्याऐवजीं लक्ष्मीधराचं एकच चित्र टांगून ठेवलं होतं ! लक्ष्मीधर हा त्याचा ' हीरो ' होता !

मात्र भावड्याचं अन् उद्योगाचं याप्रमाणं जरी इतर सर्व बाबतींत वाकडं होतं, तरी एका बाबतीत तो सारा आळशीपणा टाकून वागत असे. नवेनवे कपडे शिंप्याकडून शिवून घेण्यांत, ते अंगावर घालून मिरवण्यांत आणि त्यांची घडी जरा बिघडल्याचा संशय येतांच ते परटाकडे टाकण्यांत तो मोठी तत्परता दाखवी. या बाबतींत शिंप्याचीं व परटाचीं बिलं भागविण्यांत त्याच्याकडून काय आळस होईल तेवढाच ! कापडाचा नवा नमुना बाजारांत यायचा अवकाश, त्याचा सूट भावड्याच्या अंगावर चारआठ दिवसांत दिसल्यावांचून राहात नसे. भावड्या म्हणजे नव्या-नव्या सुती, गरम कापडाचं अन् शिलाईच्या तऱ्हांचं चालतंबोलतं प्रदर्शन होतं. अन् त्यामुळंच या रंगीबेरंगी प्रदर्शनाला एकदम एके दिवशीं शुभ्र खादीभांडाराचं स्वरूप आललं पाहून सारे लोक मोठ्या बुचकळ्यांत पडले. प्रत्येकजण दुसऱ्याला विचारूं लागला, " कायरे, आज भावड्याच्या अंगावर हातसुताची अन् हातविणीची खादी ? काय. झालं आहे तरी काय ? " एकदोघांनीं त्याच्याजवळ जाऊन कुत्सितपणें हसून त्याला विचारलंहि, " काय भाऊराव, आज एकदम मुंडेछाट नेहरू–शर्टसा पेहेरलाय् आपण ? " पण भावड्यानं त्यांच्या प्रश्नाकडे लक्ष दिल नाहीं. आपलं वेषांतर पाहतांच लोक आपली टवाळी करणार हें त्याला माहीत होतं अन् त्या टवाळीकडे अगदीं लक्ष द्यायचं नाहीं असा त्यानं मनाशीं पक्का निश्चय केला होता. " भीति अन् लाज सोडल्यावांचून प्रीतीचा डाव जिंकतां येत नाहीं " हें वचन त्यानं नुकतंच कुठंसं वाचलं होतं,

अन् तें तो आज मनाशीं सारखं घोकीत होता.

होय, त्याला प्रीतीचा डाव जिंकायचा होता, अन् सैन्याचे पवित्रे बदलणाऱ्या सेनापतीच्या धूर्ततेनं त्यानं आज आपले कपडे एकदम बदलून टाकले होते. त्याची खात्री झाली होती, कीं आतां आपण गांधींच्या मार्गानं गेलों तरच आपल्याला शांतीची प्राप्ति करून घेतां येईल अन् त्या मार्गानं जायचं म्हणजे आधीं अंगावर खादीचे कपडे घातले पाहिजेत.

शांतीची प्राप्ति म्हणजे शांता नांवाच्या ज्या मुलीवर त्याचं मन जडलं होतं तिची प्राप्ति !

शांतावर त्याचं मन कां अन् केव्हां जडलं तें भावड्याला सांगतां आलं नसतं. किंबहुना तें सांगतां येत नव्हतं म्हणूनच तो आपल्या मनांतल्या भावनेला प्रीति मानीत होता. त्या भावनेचं कारण अगर उगमस्थान अज्ञात होतं. भावड्याला येवढंच माहीत होतं, कीं एके दिवशीं सकाळीं तो जागा झाला तों त्याच्या वर्गांतली मुलगी शांता दांडेकर हिची मूर्ति त्याच्या डोळ्यांना जिकडेतिकडे दिसूं लागली. खालच्या इराण्याच्या दुकानांत सुरू असलेल्या फोनोग्राफमधल्या गाण्यांतसुद्धा तिचा आवाज त्याच्या कानांना ऐकूं येऊं लागला. वर्गांत त्या दिवशीं ती नेहमींच्या जागीं दिसली नाहीं, तेव्हां त्याला सारा वर्ग एकदम अंधकारमय भासूं लागला. त्या दिवशीं त्याला जेवण काय, नुसती साखरच त्यानं खाऊन पाहिली, तीसुद्धां गोड लागेना. सारांश, शांता मिळाल्यावांचून आपलं जिणं व्यर्थ आहे असं त्याला वाटूं लागलं. आपण प्रेमांत सांपडलों आहोंत याबद्दल त्याला संशय उरला नाहीं !

प्रेमांत सांपडलेल्या अननुभवी तरुणाची जी अवस्था व्हायची, ती प्रथम एकदोन दिवस भावड्याची झाली. तो गोंधळला, गांगरला; घटकेंत आनंदानं हृदय भरून यावं अन् घटकेंत भीतीनं आणि निराशेनं तें अजीबात रिकामं अन् कोरडं व्हावं, असा प्रत्यय त्याला आला. पण मग लवकरच त्यानं आपला तोल सावरला. त्यानं ठरवलं. कीं असं गड-

वळून जाऊन भागायचं नाहीं. मदनानं आपल्यावर गोळी झाडलीच आहे, ( आधुनिक काळांत मदनाचा ' बाण ' म्हणणं शोभत नाहीं, ' गोळी 'च म्हटलं पाहिजे ! ) अन् लढाईला तोंड लागलंच आहे, तर सावधपणान अन् अक्कलहुशारीनं वागलं पाहिजे ! शांता आपल्याला हवी तर नुसते सुस्कारे सोडीत बसल्यानं का ती मिळणार आहे ? योग्य ( आणि वेळप्रसंग आल्यास अयोग्यहि ) मार्गानं प्रयत्न केला पाहिजे आपण ! याच सुमारास रामदासांच्या कवितेवर त्याच्या कॉलेजांत एक व्याख्यान झालं. शांता व्याख्यानाला येईल अन् आपल्याला दिसेल या हिशोबानं तो व्याख्यान ऐकायला गेला. शांता आली नाहीं, त्यामुळं तो मधूनच उठून आला; पण तेवढ्यांत वक्त्यांनीं रामदासांचीं कांहीं सुंदर बोधप्रद वचनं म्हणून दाखविलीं तीं त्याच्या कानावर पडलीं व त्यांतलं " केल्यानें होत आहे रे ! " हें एक त्याच्या लक्षांत पक्कं राहिलं. तो मनाला शिकवूं लागला. " केल्यानें होत आहे रे ! " शांता हवी असेल तर प्रयत्नांत कसूर करतां कामा नये !

तो स्वतः शांतावर अनुरक्त झाला होता, पण त्याचं नांव तरी तिच्या गांवीं होतं कीं नाहीं कुणास ठाऊक ? तथापि त्यानं विचार केला, बहुशः तें असावं. त्याचे कपडे अन् त्याचं नांव माहीत नाहीं अशी एक तरी व्यक्ति कॉलेजांतच काय, सबंध शहरांत तरी असेल का ? शांताला त्याचं नांव माहीत असलंच पाहिजे. शिवाय, एकदा क्रिकेट मॅचच्या वेळेस विद्यार्थिनींना आमंत्रण द्यायच्या निमित्तानं, एकदां निवडणुकीच्या धामधुमींत आपल्या दोस्तासाठीं मतं मागतांना आणि एकदां गॅदरिंगच्या दिवशीं व्याख्यानानंतर तिची सभागृहांत राहिलेली छत्री नेऊन परत देतांना—अशा प्रकारानं तीन वेळां तो शांताशीं दोनचार दोनचार शब्द बोलला होता. परंतु याला कांहीं ओळख म्हणतां येत नव्हतं. त्याचं प्रेम तिच्या लक्षांत यावं अशा प्रकारची तर ती ओळख मुळींच नव्हती.

हें सर्व लक्षांत घेऊन भावड्यानं ठरविलं, कीं शांताशीं बोलतां येईल इतकी तरी ओळख प्रथम जमवलीच पाहिजे. त्या दिशेनं त्यानं पद्धतशीर

प्रयत्न सुरू केले. चौकशीअंतीं त्याला कळलं कीं शांताला सख्खा भाऊ नाहीं, एक लांबचा चुलतचुलत भाऊ आहे आणि त्याचं, लहान मुलांचीं खेळणीं विकण्याचं एक लहानसं दुकान एका लहानशा बोळाच्या तोंडाशीं आहे. त्यानं विचार केला—" चुलतभाऊ तर चुलतभाऊ! शांताच्या हृदयाचा रस्ता बोळाळ्या तोंडाशीं असलेल्या त्याच्या दुकानांतूनच काढला पाहिजे. " त्या दुकानांत तो वारंवार जाऊं लागला आणि प्रत्येक वेळीं रुपाया दोन रुपायांची खेळणीं घेऊन येऊं लागला. लवकरच त्याच्या राहत्या खोलीला खेळण्याच्या दुकानाचं स्वरूप येणारसं दिसूं लागल. पण त्याची त्यानं पर्वा केली नाहीं. त्याचा मुख्य उद्देश साध्य होऊं लागला होता. तो दुकानांत गेला कीं एकादे वेळीं शांता तिथं आलेली असे आणि सहजासहजीं तिचं व त्याचं थोडंसं संभाषण होत असे. हळूहळू ती रस्त्यांत भेटली कीं, " कसं काय? बरं आहे? " इतकं विचारण्याचा अधिकार त्यानं मिळविला आणि मग कांहीं दिवसांनीं तर तो कुठंहि भे'ला तर शांता आपण होऊन त्याच्याकडे पाहून हास्य करूं लागली. अहाहां! त्या मुग्ध, मोहक हास्यासाठीं शंभर रुपयांच्या कचकड्याच्या बाहुल्या अन् खुळखुळे विकत घ्यायला कोण तयार झालं नसतं?

एकदा कॉलेज सुटल्यानंतर भावड्यानं पाहिलं तों शांता एकटीच घरीं निघाली. रोज तिच्या दोघी मैत्रिणी व ती अशा तिघी मिळून कॉलेजांत येत व घरीं परत जात. आज शांताच्या मैत्रिणी कॉलेजांत आल्या नसाव्यात किंवा कांहीं निमित्तानं कॉलेजांत अधिक वेळ राहिल्या असाव्यात. कांहीं का कारण असेना, ती एकटी निघाली होती खरी. योग्य अंतर ठेवून भावड्या तिच्या मागोमाग चालूं लागला. आभाळ भरून आलं होतं. पावसाची मोठी सर केव्हां येईल त्याचा नेम नव्हता. शांताजवळ छत्री नव्हती. भावड्या मनांतल्या मनांत वरुणराजाची प्रार्थना करूं लागला, " आतां जोराची वृष्टि होऊं दे. " उजव्या हाताला एका लाकडाच्या वखारींतल्या मोकळ्या जागीं दोन लहान पोरं गमतीनं ओरडत होतीं, " येरे येरे पावसा, तुला देईन पैसा! " भावड्या मनाशीं म्हणाला, " पैसाच काय, पहिल्या तारखेला बापाकडून येईल ती अख्खी

मनीऑर्डर जशीच्या तशी देईन पावसा तुला. पण लवकर ये!"

पावसानं जणूं तो करार एकदम मान्य केला. एकदम मुसळधार सुरू झाली!

भावड्या धांवत शांताजवळ गेला व आपली छत्री पुढं करून म्हणाला, "ही घ्या! भिजताहां तुम्ही!"

"नको, जाईन मी अशीच!"

तिनं डोक्यावरून पदर घेतला होता. तिच्याकडे पाहतांपाहतां भावड्याच्या मनांत आलं कीं असा पदर घेतल्यानं ती विशेष सुंदर दिसत आहे. त्या पदरामुळं तिच्या चर्येवरचा नेहमींचा अल्लडपणा जाऊन त्याऐवजीं मोठा मोहक पोक्तपणा आला होता. फारच शोभत होता तो तिला!...

त्यानं आग्रह केला, "वा! भिजून घरीं जायचं आहे कीं काय?"

"जोरानं चाललें तर नाहीं फारशी—"

"आतां पळायचंच काय तें बाकी राहिलं आहे!"

"इश्श!"

"हं, घ्या घ्या माझी छत्री! लाजतां कसल्या त्यांत?"

"लाजत नाहीं; पण—"

"पण काय?" असं विचारीत तो तिच्याजवळ सरकला. कारण छत्रीच्या पागोळ्या तिच्या डोक्यावर पडूं लागल्या होत्या.

"मला छत्री दिलीत तर तुम्ही भिजालना?"

"त्याची नको काळजी. मी आपल्या खोलीवर जाण्याऐवजीं ती पलीकडे माझ्या एका मित्राची खोली आहे तिथं जाऊन बसेन पाऊस थांबेपर्यंत..."

तरी शांता हात पुढें करण्याऐवजीं त्याच्याकडे नुसती पाहातच राहिली.

मग "हें काय वेड्यासारखं? घ्या ही छत्री!" असं म्हणून त्यानं ती तिच्या खांद्यावर टेकली.

शांता हसली. " थँक यू. "

" अं: ! त्यांत कसलं थँक यू !

तो हसला, दूर झाला आणि पुन्हा एकदा तिच्याकडे पाहून म्हणाला, " उद्यां तुमच्या घरीं येऊन घेऊन जाईन मी आपली छत्री. "

शांताच्या पाठमोऱ्या आकृतीकडे तो किती तरी वेळ पाहात उभा राहिला. अखेर ती डाव्या हाताला वळून दिसेनाशी झाली तेव्हां त्याच्या लक्षांत आलं, कीं आपण प्रचंड ' शॉवर बाथ ' खालीं उभे आहोंत आणि आपल्याला सचैल स्नान घडलं आहे !...

दुसऱ्या दिवशीं छत्रीच्या निमित्तानं त्याला शांताकडे जातां आलं. ती फारच गोड वागली त्याच्याशीं. चहासुद्धां मिळाला त्याला.

यानन्तर तिच्या चुलत–चुलत भावाच्या दुकानीं भावड्याची आणि तिची गांठ पडली कीं ती त्याच्याशीं अधिक मोकळेपणानें बोलूं लागली. भावड्याला असंहि वाटूं लागलं, कीं आपली गांठ पडेल या हिशेबानं ती दुकानांत मुद्दाम जास्त वेळां येते ! एकदां ती दुकानांतून परत जायला निघाली; पण पायऱ्या उतरून आपली सायकल उभी करतांच उद्‌गारली " अय्या ! आतां ! "

भावड्यानं पुढें होऊन विचारलं, " काय झालं ? "

" हें पाहा कीं ! "

सायकलच्या मागच्या चाकाची दामटी वळली होती ! जवळपास सायकल–दुरुस्तीचं एकहि दुकान नव्हतं !

शांताचा दुकानदार भाऊ तिला म्हणाला,

" जा की चालत. मैलभर चालवत नाहीं का तुला ? "

ती म्हणाली, " मैलच काय, दहा मैलहि चालेन रे ! पण खडम्‌-खडम् करीत सायकल हातांत धरून न्यायची म्हणजे लाज वाटते बाई ! तूं येईनास माझ्याबरोबर ? "

" मी ? दुकान सोडून ? शहाणी आहेस ! "

भावड्या खालीं उतरून तिला म्हणाला, " द्या इकडे सायकल, मी येतों चालत तुमच्याबरोबर घरापर्यंत !"

" अगबाई ! नको. जाईन मी. तुम्हांला काय म्हणून तसदी ?"

पण, " बरं बरं " असं हंसत म्हणून त्यानं तिच्या हातून सायकल घेतलीसुद्धां !

आणि मग त्याच्याबरोबर चालूं लागल्यावांचून शांताला गत्यंतर उरलं नाहीं.

तिच्याशीं गप्पा मारीत चालतांचालतां भावड्याच्या मनांत आलं, " ही शांता पांच मैलांवर खडकीला राहात असती तर काय बहार झाली असती ! "

येथपर्यंत गोष्टी घडल्यावर भावड्याच्या मनांत जी एक गोष्ट आली ती आली नसती तरच नवल म्हणावं लागलं असतं. ती गोष्ट करणं जरा साहसाचंच होतं; पण भावड्यानं विचार केला कीं केव्हां तरी हें साहस केलंच पाहिजे. त्यानं उलटसुलट विचार करण्यांत दोनतीन दिवस जाऊं दिले. पण मग त्याला राहवेना ! त्यानं तें साहस केलं. त्यानं शांताला एक प्रेमपत्र लिहिलं.

आणि आतांपर्यंत सुरळीत चाललेल्या आपल्या नशिबानं एकदम चक्कर खाल्ल्याचा त्याला प्रत्यय आला.

कारण शांताकडून त्याला उलट उत्तर तर आलं नाहींच, पण तिला एकटीला एकीकडे गांठून बोलावं म्हटल तर त्याला तशी संधीच कुठं मिळूं नये अशा धोरणानं ती वागूं इच्छित होती हें उघड दिसलं. त्यानं पुन्हां एक पत्र धाडलं. तरी तिचं उत्तर आलं नाहीं आणि तिच्याशीं एकटीशीं बोलण्याची संधीहि ती त्याला मिळूं देईना ! भावड्यानं पुन्हां पत्र लिहिलं आणि त्याचा परिणाम झाला. पण अगदीं भलता ! तिनं त्याला एकीकडे गांठून म्हटलं,

" हें तुम्हीं चालवलं आहे काय ?"

" काय चालवलं आहे ?"

" सुदैवानं आमच्या बाबांनीं पत्रं फोडलीं नाहींत म्हणून ! पत्रं बंद करा तुमचीं ! "

" पण मग माझं प्रेम सांगू कसं तुम्हांला ? "

" नकाच सांगू "

असं फणकाऱ्यानं म्हणून शांता निघून गेली. भावड्या अधिकच इट्टास पेटला. तो दुसऱ्या दिवशीं तिच्या घरीं गेला.

शांतानं घाबरून विचारलं, " कां आलांत ? "

तो म्हणाला, " तुझ्याशीं बोलायचं आहे. "

" कशाबद्दल ? "

" तुझ्या खोलींत चल म्हणजे– "

" तुम्हांला वेड तर लागलं नाहीं ? बाबांनीं तुम्हांला पाहिलं तर– "

" काय होईल ? बरं होईल. तूं त्यांची माझी ओळख करून देशील अन् मग मला सांगतां येईल, की माझं प्रेम तुझ्यावर— "

" स्! हळू बोला. "

" ठीक आहे. बोलूं नका म्हणत नाहींस, हळू बोला म्हणते आहेस, पुष्कळ झालं. म्हणजे प्रेमाचा कट करायला तुझी तयारी आहे म्हणायची ! "

शांता रागानं लाल झाली आणि म्हणाली,

" तुम्हांला अगदींच कशी हो अक्कल नाहीं ? अगदीं स्पष्टच का सांगितलं पाहिजे तुम्हांला ? ठीक आहे, ऐका. तुमचं प्रेमबीम मला बिलकुल नको आहे. समजलांत ? पुन्हा पत्र लिहूं नका, जाळून टाकीन– अन् पुन्हा आमच्या घराचा उंबरठाहि ओलांडूं नका. गळ्याकडून घाल-वून देईन. "

असं म्हणून ती आंतल्या खोलींत निघून गेली !

यावर एखाद्यानं प्रेमाचा नाद सोडून दिला असता; पण आधीं पकडायचं नाहीं, पण एकदा पकडल्यावर मग कांहीं केल्या सोडायचं नाहीं, अशा विचित्र स्वभावाचीं जीं माणसं असतात त्यांतला भावड्या होता.

चारपांच दिवस त्यानं मनाशीं खूप विचार केला आणि एक निर्वाणीचा बेत ठरविला.

प्रेमासाठीं अन्नसत्याग्रह करायचा त्यानं निश्चय केला !

गांधींच्या उपासाच्या हकीगती त्यानं वाचल्या होत्या. इतरहि कित्येक छोट्यामोठ्या पुढाऱ्यांनीं आपले इच्छित हेतु साधण्यासाठीं उपास पुकारलेले त्यानं ऐकले होते. त्यानं विचार केला, प्रेमासाठीं उपास कां करूं नये आपण ?

बस्स, शांताच्या दाराशीं धरणं धरून बसायचं, अन् ती नाहीं तिचा बाप विचारायला आला तरी निधड्या छातीनं सांगायचं, कीं " सविनय सत्याग्रह आहे हा. मला शांता मिळेपर्यंत मी उपास करणार ! "

अहाहा ! प्रेमासाठीं प्राणांतिक उपास ! केवढी उदात्त आणि काव्यमय कल्पना होती ही ! आजपर्यंत पर्शियन, संस्कृत, फिरंगी कुठल्याहि वाङ्मयांतल्या कुठल्याहि प्रेमिकानं केलं नव्हतं असं एक नवं साहस तो करून दाखविणार होता ! या विचारानं त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले !

उपासाचं तंत्र त्यानं आपल्या एका मित्राला विचारून घेतलं. त्याच्या मित्राच्या सांगण्यावरून असं दिसलं, कीं ज्याला उपास करायचा आहे तो प्रथम आपल्या उपासाची बातमी सगळ्या वर्तमानपत्रांत येईल अशी व्यवस्था करतो आणि उपासाला बसतो. दुसऱ्या दिवसापासून त्याच्या प्रकृतीचे ' रिपोर्ट ' वर्तमानपत्रांत येऊं लागतात. प्रथम दोन दिवस उपास करणाराची प्रकृति बरी असते आणि चर्याहि प्रसन्न असते. मग तब्येत बिघडूं लागते, वजन घटूं लागतं, स्नेहीमंडळी चिंतातुर होतात. अशा वेळीं एखाद्या पुढाऱ्याची आग्रहाची तार येते कीं उपास बंद करा. एकाहून अधिक तारा आल्या तर फारच चांगलं. मग स्नेहीमंडळींच्या आग्रहाला फार जोर चढतो. अखेर ज्यासाठीं उपास सुरू केला तें साध्य झालं नसलं तरी स्नेहीमंडळींचीं मनं दुखविलीं तर अहिंसा घडते या न्यायाचा आश्रय घेऊन अहिंसेचं व्रत पाळण्यासाठीं उपास करणारा उपास सोडा-

यला तयार होतो ! मग त्याला मुसंब्यांचा रस पाजण्यांत येतो, चार स्नेह्यांचीं अभिनंदनपर भाषणं होतात—म्हणजे संपलं !

भावड्यानं हें सारं तंत्र नीट समजून घेतलं आणि दोघांतिघां मित्रांना आपल्या गुप्त मसलतींत घेतलं. उपासाची बातमी वृत्तपत्रांत आकर्षक रीतीनं येत राहील अशी व्यवस्था करण्याची जबाबदारी एका मित्रानं पतकरली. उपास बंद करण्याबद्दल गांधींची तार आणविणं अशक्य होतं; पण जवळजवळ गांधी बनलेले दोघेतिघे प्रांतिक पुढारी भावड्याच्या ज्या एका मित्राच्या दोस्तींतले होते, त्यांनी हमी घेतली कीं त्यांजकडून आपण संदेश व तारा तर आणूंच, पण अखेर उपास सोडायच्या दिवशीं मुसंब्यांचा रस घ्यायला ते येतील अशीसुद्धां व्यवस्था आपण करूं. मुसुंब्यांच्या रसपानविधीला हजर राहिल्यावर ते भाषण केल्यावांचून निमूटपणें परत जातील हें अर्थातच शक्य नव्हतं ! आणखी एका मित्रानं उपासाच्या या मोहिमेंतली डॉक्टरी बाजू संभाळायचं कबूल केलं. . .

अशा प्रकारें सारी तयारी झाली आणि भावड्यानं ठरवलं, कीं उद्यां शांताची भेट घ्यायची, माझं प्रेम स्वीकारतेस कीं नाहीं असं तिला अखेरचं विचारायचं, अन् तिनं नाहीं म्हटलं कीं लगेच तिच्या दाराशीं धरणं धरून प्राणान्तिक उपासाला सुरवात—

पण तितक्यांत त्याच्या मित्रांपैकीं एकजण त्याला म्हणाला,

"अरे, पण तुझ्या तयारींत एक मोठंच वैगुण्य राहिलं कीं !"

"तें कोणतं रे ?" भावड्यानं आश्चर्यानं विचारलं.

"अरे, उपासाच्या वेळेस पोषाख कोणता करणार तू ?"

"तें सगळं मीं योजून ठेवलं आहे. असा सुंदर सूट घालतों कीं बघतच राहतील सगळे माझ्या—"

"गाढव आहेस !"

"तें कां ?"

"अरे, तूं प्राणान्तिक उपास करणार म्हणजे गांधींचा अनुयायी होणार. तुझ्या उपासाचं सारं तंत्र तूं गांधींपासून घेणार. मग तुला सुटाबुटाचा

पोषाख कायम ठेवून कसं चालेल ? "

" कां नाहीं चालणार ? "

" तुला कळायच्या नाहींत या गोष्टी. माझं ऐक. खादीचा पोषाख केल्यावांचून असले उपास सुचत नसतात. शिवाय ज्या तीनचतुर्थांश गांधींचे संदेश मी तुझ्यागाठीं मिळविणार आहें, ते तू सूटबूट घालून शांतीच्या दाराशीं पडलास तर संदेश देतील म्हणतोस काय ? "

" खरंच कीं ? "

" हां ! तेव्हां माझं ऐक. खादीचा पोशाख केला पाहिजे तुला ! "

ताबडतोब भावड्यासाठीं खादीचा पोषाख तयार करण्यांत आला व त्या दिवशीं तो पोषाख चढवूनच भावड्या कॉलेजांत गेला.

त्याचा तो नवा वेष पाहून सार कॉलेज आश्चर्यानं थक्क झालं ! वर्गांत स्टँपिंग झालं, हंशा झाला; जो तो बुचकळ्यांत पडला, कीं भावड्याच्या डोक्यांत हें नव वेड कुठलं आल !

परंतु भावड्यानं लोकांच्या आश्चर्याकडे अगर टवाळीकडे लक्ष दिलं नाहीं. त्याचा कार्यक्रम आंखला गेला होता व त्याप्रमाणं वागण्याचा त्याचा दृढनिश्चय झालेला होता.

कॉलेज सुटल्यावर त्यानं चहा–टोस्टवर भरपूर हात मारला अन् शांताच्या घराकडे प्रयाण केलं.

शांता नुकतीच घरीं परत येऊन चहा पिऊन आपल्या खोलींत वाचीत पडली होती.

भावड्याला पाहतांच तिनं कपाळाला आठ्या घालून विचारलं—

" पुन्हां कां आलांत तुम्ही ? "

" तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे. "

" माहीत आहे मला काय तें.

" पण पुन्हां एकदां नीट ऐक. "

" काय ? "

" तुझ्याइतकी सुंदर, तुझ्याइतकी चतुर, तुझ्याइतकी गोड, तुझ्या–"

" समजलं, समजलं, पुढचं वाक्य बोला. "

" तुझ्यावर माझं भयंकर प्रेम—"

" भयंकर खरंच ! "

" किती दुष्ट आहेस ! "

" गोड होतें ती क्षणांत दुष्ट झालें का ! "

" दुष्ट झालीस तरी मला तें गोडच वाटतं. माझं तुझ्यावर अतिशय प्रेम आहे. तुझ्यावांचून मला खाणंपिणं गोड लागत नाहीं. भूक उडाली आहे. झोंप संपली आहे. थोडक्यांत म्हणजे तुझी प्राप्ति झाल्यावांचून जिवंत रहाणं मला अशक्य झालं आहे ! "

" मग म्हणणं काय तुमचं ? "

" माझ्याशीं लग्न कर. "

" शीः ! "

" मी एक निश्चय करून आलों आहें. "

" तो कसला ? "

" तुझा रुकार मिळाल्याशिवाय इथून परत न जाण्याचा. "

" अगबाई ! म्हणजे ? "

" तूं माझं प्रेम स्वीकारलं नाहींस तर तुझ्या दाराशीं मी पडून रहाणार आहें अन् प्राणांतिक उपास सुरू करणार आहें ! "

" अय्या ! म्हणजे धाकदपटशा—"

" छे, छे ! असला भलता शब्द वापरूं नकोस. याला सविनय सत्याग्रह म्हणतात. "

" नांव निराळं ठेवलं तरी अर्थ तोच ! तुम्हीं असलं कांहीं करतां कामा नये ! "

" मग माझ्या म्हणण्याला कबूल हो. "

" आतां काय करावं बाई ! तुम्ही चालते होतां कीं नाहीं, आलांत तसे ! "

" तूं हो म्हण, कीं चाललों ! "

" नाहीं ! ".

" मग बसणार मी तुझ्या दाराशीं..."

" रामा, ए रामा—" अशा मोठ्यांदा हांका मारीत शांता खोलींतून बाहेर धांवत गेली.

परन्तु राम, परशुराम, कृष्ण सारे दशावतार भावड्याच्या अंगावर आले असते तरी त्यांना पुरून उरण्याइतका त्याचा कृतनिश्चय बळकट होता. मग एकटा रामा वाल्ू काय करणार ? आणि शिवाय शांतानं त्याला मोठमोठ्यांदा हांका मारल्या खऱ्या, पण तो त्या वेळीं दाढी करून घेण्यासाठीं ' सलूनांत ' गेला होता !

भावड्यानं शांताच्या बंगल्याच्या व्हरांड्यांत धरणं धरलं ! त्याचा उपास सुरू झाला !

दुसऱ्या दिवशीं सगळ्या वृत्तपत्रांत या अपूर्व उपासाची बातमी फड· कली ! " एका सुशिक्षित प्रेमवीराचें प्रेमासाठीं प्राणान्तिक उपोषण ! " " लग्न होत नसेल तर मरण पत्करणारा सत्याग्रही ! " " प्रेमाच्या लढ्यांत गांधीवादाचा उपयोग करणारा पहिला प्रेमिक ! " असे चित्रविचित्र जाड टाइपांतले मथळे वाचतांच सारं शहर खडबडून जागं झालं ! भावड्याच्या मुलाखती घ्यायसाठीं वार्ताहरांची धावपळ सुरू झाली. कॅमेरे घेऊन फोटोग्राफर जमा झाले. कॉलेजांतील वसतिगृहांतून विद्यार्थीविद्यार्थिनींचे घोळकेच्या घोळके भावड्याला बघायला आले. शहरांतल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी लकडी पुलावरून डेक्कन जिमखान्याकडे लोटूं लागल्या. त्यांत स्त्रिया, पुरुष, शाळेंतलीं पोरं आणि सनातनी म्हातारे पेन्शनरसुद्धां होते ! ती गर्दी पाहून स्थानिक पुढाऱ्यांच्या मनांत खचित आलं असेल, " आपल्या अखेरच्या यात्रेला इतकी गर्दी होईल काय ? "

या साऱ्या प्रकाराचा शांताला व तिच्या घरच्या माणसांना विलक्षण उपसर्ग होऊं लागला. एक तर त्यांच्या बंगल्यापुढची गर्दी एक मिनिटभर ओसरेल तर शपथ ! आणि शिवाय, ओळखीचे लोक घरांत येऊन नाहीं नाहीं ते प्रश्न विचारूं लागले ! शांताला तोंड काढायची सोय उरली

नाहीं ! तिच्या बापाची भेट घेऊन जो तो आपापल्या बुद्धीनं सल्ला देऊं लागला. कोणी सुचवीत, " तात्पुरतं वचन द्या त्या वेडगळाला म्हणजे जाईल उठून." कोणी सांगत, " पोलिसांत वर्दी द्यावी." अन् कोणी म्हणत, " अहो, करायचे आहेत काय पोलीस ! तुम्ही स्वतःच बाहेर चला अन् दोन श्रीमुखांत द्या ठेवून मूर्खाच्या, म्हणजे बघूं किती वेळ टिकतं आहे हें अंगांत आलेलं !" या फुकट उपदेशानं कान किटायची अन् डोकं पिकायची वेळ आली शांताच्या घरांतल्या माणसांवर ! व्हरांड्यांत पडून राहिलेली ही उपाशी ब्याद कशी घालवावी हें त्यांना समजेना !

आणि एकेक दिवस उलटूं लागला तों तों वृत्तपत्रांतल्या बातम्यांचा धिंगाणा वाढूं लागला. भावड्याचे स्नेहीदेखील मुलाखती देऊं लागले. पुढाऱ्यांचीं मतं प्रसिद्ध होऊं लागलीं. अग्निहोत्री-मंदिरांत सभा झाल्या. लांबलांबचे संदेश येऊं लागले. अशीसुद्धां गप्प उठली, कीं प्रेमासाठीं प्राणान्तिक उपोषण करणाऱ्या या असामान्य तरुणाचं अभिनंदन करणारी तार ड्यूक ऑफ विंडसरकडून आली असून त्या तारेंत लिहिलं होतं, " शाबास पठ्ठ्या ! माझ्याहि पुढं तूं गेलास ! मी प्रेमासाठीं सिंहासन सोडलं, पण तूं प्राण सोडायला तयार आहेस. मी डोक्यावरची टोपी काढून तुला अभिवादन करतों !"

शांताच्या वडिलांनीं दोन दिवस मोठ्या प्रयत्नानं डोकं शांत ठेवलं. पण मग त्यांना राहवेना. ते तिला म्हणाले—

" आज मी करणार बंदोबस्त."

" म्हणजे ! काय करणार ?"

" हें पाहिलंस का ?" टेबलावरच्या एका लांबलचक वेताच्या छडीकडे त्यांनीं बोट दाखविलं.

शांतानं घाबरून विचारलं, " म्हणजे काय ? मारणार कीं काय ?"

" होय. तोच एक योग्य इलाज दिसतो आहे मला."

" छे छे ! तसं करून नाहीं चालायचं."

" मग काय, हा सारा पांचटपणा सहन करायचा कीं काय ?"

"नाहीं. विचार करून मीं एक युक्ति ठरवली आहे मनाशीं."

"होय? ती काय?"

"सांगतें. आपल्यासमोरच्या बगळे वकिलांची मदत मिळाली तर–"

"मूर्खच आहेस. वकील अन् कोर्टकचेरी करीत बसलों आपण तर–"

"तशी मदत नाहीं! निराळीच. बगळ्यांची बगी आहेना?"

"ती अष्टवक्रा कुब्जा? पंचवीस वर्षांची झाली तरी जिला हळकुंड लागेना ती!"

"हं तीच. तिचा उपयोग छान करून घेतां येईल आपल्याला."

असं म्हणून शांतानं आपल्याला सुचलेली युक्ति सविस्तरपणें बाबासाहेबांना सांगितली. त्यांना ती बिलकूल पसंत पडली आणि ते धांवतच बगळे वकिलांकडे गेले.

मध्यरात्रीच्या सुमारास भावड्या व त्याचे दोघे स्नेही येवढीच मंडळी व्हरांड्यात होतीं. ते दोघे स्नेही अर्धवट जागे होते. भावड्याला अशक्ततेमुळें झोंप लागली होती. विजेची बत्ती लागलेली होती.

इतक्यांत दोन व्यक्ति फाटक लोटून आंत शिरल्या व व्हरांड्यावर आल्या. भावड्याच्या स्नेह्यांना प्रथम वाटलं वृत्तपत्राचे बातमीदार असावेत. ते उठून बसले, पण पाहतात तों एक उंच, काटकिळे, कुबड काढलेले, चष्मेवाले गृहस्थ व लठ्ठ, काळी, दंताडी कुरूप बाई त्यांच्यापुढें उभी!

तो उंच, काटकिळा गृहस्थ म्हणाला—

"माझं नांव बगळे वकील. ही माझी एकुलती एक मुलगी. हिचं नांव बगूताई"

"असं का?"

"हं. माझं काम आहे थोडं."

"सांगा. बसा कीं."

"पण काम तुमच्याशीं नाहीं; भाऊरावांशीं आहे. उठवा त्यांना."

भावड्याच्या स्नेह्यांनीं त्याला उठवलं.

डोळे उघडण्यापूर्वीच त्यानं विचारलं, "काय रे? शांतीचा रुकार आला काय?"

" नाहीं, पण हें अध कोण आलं आहे तुझ्याकडे." .

भावड्यानं डोळे उघडून बगळे वकिलांकडे पहातांच ते म्हणाले,

" माफ करा आपली झोंपमोड केल्याबद्दल. पण फार जरूरीचं काम आहे माझं आपल्याकडे."

" काय ?"

" ही माझी मुलगी, अगूताई—"

भावड्यानं डोळे वळविले, पण लगेच गच्च मिटून घेतले. ते तसेच मिटलेले ठेवून त्यानं विचारलं,

" ही तुमची मुलगी. पुढं ?"

" पुढं कांहीं विशेष नाहीं. तिचं तुमच्यावर विलक्षण प्रेम जडलेलं आहे. तुम्हांला रस्त्यांत अरेच वेळां पाहिलं आहे तिनं, अन् पहिल्यांदा पहिल्यापासूनच ती तुमच्यावर अनुरक्त झालेली आहे. आतां तुम्ही प्रेमासाठीं दिव्य करायला तयार झालांत हें पाहून तर ती अगदीं वेडी झाली आहे तुमच्यासाठी."

डोळे दोन्ही हातांनीं झाकून भावड्या खेकसून म्हणाला,

" मला कशाला सांगतां ही रडकथा ?"

" तिचा निश्चय झाला आहे."

" काय ?"

" तुमच्याशींच लग्न करायचं असा."

" पण तें शक्य नाहीं !"

" मग तिनं ठरवलं आहे."

" काय ?"

" तुम्ही तिच्याशीं लग्न करायचं कबूल करीपर्यंत प्राणांतिक उपास करणार आहे ती !"

" काय, म्हणतां काय ?"

" ती उपास सुरू करणार ! अन् तोसुद्धां इथंच तुमच्या समोरासमोर धरणं धरून बसून !"

" बापरे ! "

" त्याबद्दल वर्तमानपत्रांत द्यायचा मजकूरसुद्धां तयार केला आहे मी ! हे बघा कागद. दाखवूं वाचून ? "

" अहो, तुम्ही सभ्य गृहस्थ आहांत कीं खाटिक आहांत ? "

" मी खाटिक कसा बुवा ? माझ्या मुलीचं मन चोरलंत त्याला मी काय करूं ? हं, बोला, बगूताईशीं लग्न करायला कबूली देतां, कीं होऊं दे तिचा उपास सुरू ? "

डोळे मिटल्यामिटल्या भावड्या विचार करूं लागला, या अकल्पित संकटांतून स्वतःची कशी सुटका करुन घ्यावी याबद्दल.

दोनचार मिनिटांनीं बगळे वकिलांनीं विचारलं,

" हं, मग काय भाऊराव ? "

" का—य ? "

" काय ठरलं ? "

" माझी एक प्रार्थना ऐका. "

" कोणती ? "

" माझा ' आंतला आवाज ' काय सांगतो तें पाहायला मला वेळ द्या. "

" आंतला आवाज ? हाः हाः ! बऽरं. किती वेळ हवा ? "

" उद्यां सकाळपर्यंत. "

" ठीक आहे. पण नीट लक्षांत आलंना माझं म्हणणं ? आमच्या बगूताईचं प्रेम—"

अंगाला शहारे देऊन भावड्या काकुळतीनं म्हणाला,

" पुन्हां नका हो सांगूं तें. आलं माझ्या लक्षांत सगळं. "

" मग सकाळीं येऊं ? "

" हो. सकाळीं या. "

पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं बगळे वकिलांनीं आपल्या खिडकींतून

पाहिलं तों समोर दांडेकरांच्या व्हरांड्यांत भावड्याची पथारी होती कुठं ?......

लोकांच्या झुंडीच्या झुंडी दांडेकरांच्या बंगल्यावर येत होत्या आणि परत फिरत होत्या !

प्रेमासाठीं प्राणांतिक उपास करणाऱ्या प्रेमवीराच्या गंभीर नाटकाला एकाएकीं पलायनाच्या फार्सचं स्वरूप कां आलं कोणालाच कळेना !

भावड्या पुन्हा त्या कॉलेजांत परत आला नाहीं ! कोणी म्हणे, तो कराचीच्या कॉलेजांत गेला. कुणी म्हणत, कीं त्यानं कलकत्त्यास उपासाला चालणाऱ्या पदार्थांचं दुकान काढलं आहे. अन् एकदा तर गप्प उठली, कीं आपल्या एकंदर उपाशी प्रेम–प्रकरणाचा चित्रपट करून द्यायच्या कंत्राटानं तो थेट हॉलिवुडला जायच्या खटपटींत आहे !

———

# भाल्याची शिकार : : ३

भाल्याचा टांगा स्टेशनच्या आवारांत येऊन पुरता उभा राहातो न राहातो तों गाडी सुटण्याच्या वेळची घंटा झाली. तोंडांतून फेस गाळणाऱ्या मरतुकड्या घोड्याला एकदम हिसका बसला तर त्याचं बरेच दिवस कसंबसं लांबलेलं प्राणोत्क्रमण कदाचित् फटदिशीं होईल, असा विचार मनांत आला असूनहि त्याची पर्वा न करतां भाल्यानं आपली छोटी कातडी बॅग हातांत घेऊन टांग्यांतून उडी मारली आणि तिकीट ऑफिसकडे धूम ठोकली. " मास्तर, तिकीट द्या लवकर ! " असं धापा टाकीत ओरडून खिडकीच्या बिळांतून त्यानं पैसे आंत सरकाविले, अन् मास्तरांनीं तारखेच्या यंत्रावर ' खटक ' करून फेकलेलें तिकीट ओरबाडून बाहेर काढलं. तो प्लॅटफॉर्मवर गेला तों गाडी चालू झाली होती. त्यानं धाव मारली आणि एका डब्याच्या दांड्याला धरून, तो कसाबसा गाडींत शिरला. डब्यांत कितीहि गर्दी असली तरी कुरकुरायचं नाहीं, उभं राहावं लागलं तरी राहायचं, गाडी गाठली हें काय थोडं झालं—

असे विचार त्या क्षणीं त्याच्या मनांत आले.

पण आंत वळून पाहातो तों काय आश्चर्य ! सर्वच डबा रिकामा होता ! फक्त समोरच्या दारालगतच्या खिडकीजवळ एक स्त्री बसलेली होती !

डबा अगदींच रिकामा कसा याचा त्याला मोठा विस्मय वाटला. पण लगेच दुसऱ्याच क्षणीं त्याच्या मनांत एक कल्पना आली. त्यानं दरवाजाबाहेर डोकं काढून, मान मुरडून डब्याच्या बाहेरची बाजू निरखून पाहिली. होय, त्याची कल्पना खरी होती. हिरव्या–तांबडया रंगाचं बाईचं चित्र त्या डब्यावर होतं. अरे बापरे ! म्हणजे तो खुशाल बायकांच्या डब्यांत शिरला होता तर ? आतां त्या स्त्रीनं जर साखळी ओढली तर ? त्याचा काय नेम ? या गृहस्थानं माझा विनयभंग केला असं खोटं-नाटंसुद्धां ती खुशाल सांगेल कदाचित्. हल्लीं स्त्रियांना फार नाद लागला होता विनयभंगाची तक्रार करण्याचा. डब्यांतल्या या स्त्रीनं आपल्या-विरुद्ध असा कांहीं ओरडा केला तर मग आपल्या बेअब्रूला काय सीमा ! ' सकाळ ' ' संध्याकाळ ' सर्व वर्तमानपत्रांत मोठमोठ्या टाइ-पांत छापून येईलः " युनिव्हर्सल रेडिओचे सेल्समन भालचन्द्र भास्कर भाकरे यांच्यावर खटला ! दिवसाढवळ्या एका असहाय स्त्रीचा धांवत्या गाडींत विनयभंग ! " ......अरे बापरे ! काय काय धिंडवडे निघतील आपले तें काय सांगावं ?

त्यानं हळूच मान वळवून त्या स्त्रीकडे चोरट्या नजरेनं पाहिलं. उठून साखळी ओढायच्या विचारांत ती नव्हती खास. नशीब म्हणायचं, असा समाधानाचा उद्गार मनाशीं काढून भाल्या तसाच दाराशीं उभा राहिला आणि बाहेर वाकून पाहूं लागला.

पण थोडा वेळ जातांच त्याचं मन चुळबुळ करूं लागलं. ज्या संक-टाची त्याला भीति वाटली होती, तें टळल्यामुळं निर्धास्त झालेलं त्याचं मन त्याला तसं बाहेर पाहात उभं राहूं देईना. तें त्याला म्हणूं लागलं, एवीतेवी तूं या डब्यांत शिरला आहेस अन् आतां सुखरूपहि आहेस. मग

आतां त्या स्त्रीकडे पाहायला तुला काय हरकत आहे ? ती जर सुन्दर असेल तर तिच्याकडे तूं ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहींस तर तिचा एक प्रकारें विनयभंगच नाहीं का होणार ? तिला नाहीं वाटणार कदाचित् तो विनयभंग; पण म्हणून काय झालं ? पुरुषासारखा पुरुष तूं. तुला नाहीं का चुटपुट लागून राहायची ?

भाल्या आंत वळला आणि सिगरेट शिलगावायच्या मिषानं त्यानं त्या स्त्रीकडे चांगलं निरखून पाहून घेतलं. पाहून घेतलं म्हणजे एकदां पाहिल्यानं त्याचं पाहाणं आटपलं असं नव्हे, तर तो पुनः पुनः पाहात राहिला. कारण तो जों जों तिच्याकडे अधिक पाहूं लागला, तों तों तिचं तारुण्य आणि सौन्दर्य त्याच्या नजरेंत अधिकच भरूं लागलं.

अठराएकोणीस वर्षांची असावी ती. बहुधा कॉलेजांत जात असेल. मात्र जितकी ती सुन्दर दिसत होती तितकीच ती साधी होती. तिचीं वस्त्रं उंची नव्हतीं, किंवा तिच्या वेषभूषेंतही कृत्रिम थाटमाट नव्हता. तिच्या मुद्रेवर विलक्षण तेज दिसत होतं आणि हातांतल्या पुस्तकावर लावलेले डोळे इतके पाणीदार दिसत होते, कीं त्यांची नजर वर उचलली जाऊन जर आपल्याकडे लागली तर लावण्यसम्पन्न स्त्रीच्या सुन्दर नेत्रांतून विलक्षण धारेचे बाण सुटत असतात असं जें आपण आजपर्यंत केवळ काव्यांत वाचीत आलों त्याचा रोमांचकारी अनुभव आपल्याला येईल अशी भाल्याच्या मनाची खात्री झाली. तिनं पुस्तक वाचायचं सोडून आपल्याकडे एकदां बघावं अशी विलक्षण तीव्र इच्छा त्याला झाली. पण बराच वेळ झाला तरी ती तसं कांहीं करीना. एखाद्या व्यक्तीनं आपल्याकडे नजर द्यावी असं वाटत असेल तर ‘ इकडे बघ ’ असा मनांतल्या मनांत त्या व्यक्तीला हुकूम करीत तिच्याकडे दृष्टि लावावी असं त्यानं कुठल्या तरी एका पुस्तकांत वाचलं होतं. म्हणून त्यानं तसं करून पाहिलं, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. पुस्तकाकडे लावलेले डोळे ती कांहीं केल्या दूर करीना. भाल्या डब्यांत आहे याची तिला खरोखरच दाद तरी नसावी, किंवा त्याच्याकडे मुद्दाम दुर्लक्ष करा-

यचं तरी तिनें मनाशीं ठरविलेलं असावं. यापैकीं कोणतीहि गोष्ट खरी असली तरी त्यांत आपला अपमान आहे असं भाल्याला साहाजिकच वाटलं.

एकदां त्याला वाटलं, कीं आपण खाकरलों तर कदाचित् ती आपल्याकडे पाहील. पण लगेच त्यानं विचार केला, कीं नको; खाकरणं विनयभंगाच्या सदराखालीं येत असलं म्हणजे ?

तितक्यांत वाऱ्याचा एवढा मोठा झोत आला, कीं तिच्या हातांतल्या पुस्तकाचीं पानं फिर्रकन् मिटलीं.

त्याबरोबर ती दचकली, आणखी वर मान करून ज्या दिशेकडून वारा आला त्या दिशेकडे तिनं कटाक्ष टाकला.

अशी सन्धि आल्यावर भाल्या ती वाया दवडणार ?

तो पुढें झाला, अन् "फारच सुटलं आहे शिंचं वारं" असं तिच्याकडे पाहून हंसत म्हणत खिडकी बन्द करूं लागला.

त्याला पाहातांच ती म्हणाली,

" अगबाई, तुम्ही...? "

भाल्याला वाटलं, सम्पलं ! आतां ती साखळी खचित ओढणार. अगदीं गयावया करून तो म्हणाला,

" मी वाटलं तर धावत्या गाडींतून उडी टाकतों; पण साखळी नका ओढूं ! "

" साखळी ? नि कसली ? " तिनं विचारलं.

हात्तिच्या ! तिला माहीतच नव्हतं अन् आपण मात्र तिच्या मनांत तें उगीच भरवून देत होतों. आतां बोलणं ताबडतोब बदललं पाहिजे.

भाल्या म्हणाला, " नाहीं. म्हणजे मीं येऊं नये या डब्यांत, पण त्याचं असं झालं, कीं डब्यांत चढल्यावर मग मला कळलं, कीं हा बायकांचा डबा. उतरावं तर गाडी चालू झाली होती. तेव्हां म्हटलं, काय व्हायचं असेल तें होऊं द्या. "

" इश्श, व्हायचं काय ! " असं म्हणून ती हसली.

आपल्या शब्दांचा भलताच अर्थ होतो हें लक्षांत येऊन भाल्या चांगलाच चपापला. बोलण्याचा रोख बदलायची दुसरी पाळी आली त्याच्यावर. तो म्हणाला,

" व्हायचं म्हणजे, गार्डानं हटकायचं-बिटकायचं—दुसरं काय ? काय वाचीत होतां आपण मघापासून ? फारच चांगलं दिसतं आहे पुस्तक ! "

" चांगलं ! घरीं मिळालं असतं वाचायला तर हातांतसुद्धां धरलं नसतं. पण प्रवासांत मनुष्य अगतिक होतं. छापील मजकूर डोळ्यासमोर असला म्हणजे झालं, अशी असते माणसाची स्थिति. या स्थितीच्या जोरावरच बहुतेक साप्ताहिकं अन् मासिकं चालतात, नाहीं का ! "

भाल्याच्या मनांत आलं, आंधळा मागतो एक डोळा, देव देतो दोन ! नुसती सुन्दरच नव्हती ही मुलगी, तर अनोळखी पुरुषाशीं चांगली निर्भयपणानं बोलणारीहि होती.

मग भालचन्द्रपन्तांच्या वक्तृत्वाला पूर आल्यावांचून कुठला राहायला ! दुथडी भरून सोडली त्यानं आपली वाग्गंगा. 'मदर्न मराठा' ची ती गाडी रे रे करीत चालली होती; पण भाल्याच्या जिभेला असा वेग आला होता कीं, ज्याचं नांव तें !

आपण कोणत्या कम्पनीचे सेल्समन आहोंत, रेडिओ विकण्यांत कसे पटाईत आहोंत, वास्तविक आपण स्टेशनवर गाडीच्या वेळेच्या आधींच कसे येणार होतों, पण एक गिऱ्हाईक गटविण्यांत कसा भलताच वेळ गेला, इत्यादि सारी हकिगत त्यानं अगदीं विस्तारानं अन् चटकदार रीतीनं सांगितली. जन्मजात सेल्समन होता तो.

होय, भाल्या जन्मजात सेल्समन होता. त्यामुळं त्याची सौन्दर्यदृष्टि तिच्या मोहक मुद्रेवर खिळलेली असतांनाच त्याची धन्देवाईक नजर तिच्या गळ्यांत ( किती सुन्दर अन् नाजूक होता तो गळा ) आपण एक रेडिओचा सेट बांधूं शकूं या कल्पनेकडे पुनः पुनः वळत होती. म्हणून तो तिला म्हणाला,

" तुम्ही घ्याना एक रेडिओ छानपैकीं. फार स्वस्त झाले आहेत आतां."

" किती पडते हो किंमत चांगल्यापैकीं रेडिओला ?"

" कांहीं नाहीं. सव्वातीनशें रुपये जर खर्च केलेत, तर-"

" अय्या, हें स्वस्त काय ?" असा उद्‌गार काढून तिनें आपला पंजा तोंडाला लावला.

" अहो, वाटते मोठी रक्कम; पण रेडिओ असा भक्कम कीं आपल्या-ऐवजीं नातू पणतू ऐकायला लागले तरी तो काम देईल. हें आमच्या रेडिओचं लिटरेचर तर बघा जरा."

असं म्हणून भाल्या आपली कातडी बॅग उघडायला लागला.

पण तितक्यांत गाडीचा वेग एकदम मन्द झाला. " स्टेशन आलं वाटतं ?" असं ती मुलगी म्हणाली, अन् दुसऱ्याच क्षणीं गाडी स्टेशनांत शिरून प्लॅटफॉर्मवरच्या 'घ्या अंजिरंऽऽऽ', 'च्या ग्राऽऽमऽ' अशा आरोळ्या कानीं पडल्या.

भाल्यानं घाईघाईनं दोनचार रंगीबेरंगी पत्रकं त्या मुलीपुढं टाकलीं, बॅग बंद करून उचलली, अन् दार उघडून गाडी पुरती थांबायच्या आधींच खालीं उडी ठोकली. त्यानं धावत जाऊन दुसरा डबा गांठला.

तो त्या डब्यांत शिरून बसला खरा, पण त्याचं मन बायकांच्या डब्यांत राहिलं होतं. गाडी सुरू होऊन गार वाऱ्याची झुळूक अंगावरून जाऊं लागतांच त्याचे डोळे मधून मधून मिटूं लागले. पण त्याच्या मिटलेल्या डोळ्यांपुढं त्या खेळकर हंसऱ्या तरुण सुन्दर मुलीची मूर्ति सारखी नाचत होती. पुढच्या स्टेशनवर त्यानं खालीं उतरून अंजिरं विकत घेतलीं आणि तो बायकांच्या डब्याकडे गेला.

खिडकींतून अंजिरांचा पुडा पुढं करीत त्यानं म्हटलं, " हीं घ्या. छान ताजीं आहेत बघा."

ती आपल्या जागेवरून म्हणाली, " नको नको."

" अहो असं काय करतां ? घ्या कीं."

" नाहीं, खरंच नकोत. "

" हं, घ्या झालं आतां. " असं म्हणून त्यानं तो पुडा बाकावर ठेवलाच. ती हसली, उठून खिडकीजवळ आली आणि आपली मनीबॅग उघडीत म्हणाली,

" किती पैसे ? "

" अहो, मी रेडिओचा सेल्समन आहें, अंजिरांचा नाहीं. "

तें ऐकतांच ती अगदीं मनापासून हंसली आणि मग एकदम सारा संकोच टाकून पुडयांतला एक अंजिर उचलून खाऊन म्हणाली,

" किती गोड हो ! "

" हं, फार गोड ! "

काय गोड तें ज्याचं त्याला माहिती !

ती म्हणाली, " इश्श, पण हें काय ? तुम्ही घ्या ना. "

तिन पुढं केलेलीं चार अंजिरं भाल्यानं घेतलीं. त्याला तीं आतां किती गोड लागणार होतीं त्याची कुणाला काय कल्पना ?

तितक्यांत गाडीची शिटी झाली.

भाल्यानं घाईघाईनं विचारलं, " तुम्ही पुण्यासच जाणार ना ? "

तिनं हसून मान हालविली.

तिनं न विचारतांच त्यानं सांगून टाकलं, " मी सुद्धां. " आणि मग तो आपल्या डब्याकडे धावला.

पुढच्याहि स्टेशनवर तो खालीं उतरला; पण त्या स्टेशनवर कांहींच विकायला आलेलं नव्हतं. फक्त एका कळकट ताटांत काळेकुळकुळीत झालेले शिळे पेढे घेऊन एक घाणेरडा म्हातारा मारवाडी झाडाखालीं बसला होता. या अजब मिठाईचा त्या मुलीला थोडाच उपयोग होता ! पण कांहीं द्यायसाठीं नव्हे, तर नुसतं बोलण्यासाठीं तिच्याकडे जायला काय हरकत आहे, असा धिटाईचा विचार करून भाल्या तिच्या डब्याकडे जाऊं लागला. पण आठदहा पावलं टाकतांच त्याला दिसून आलं, की गार्डसाहेबांची स्वारी अगदी बायकांच्या डब्याला खेटून उभी आहे.

मग कसला भाल्या पुढं जातो ? जणूं आपण नळावर हातपाय धुवायला जाणार होतां अशी त्यानं बतावणी केली, अन् हात धुऊन ते तसेच हालवीत तो परत पुरुषाच्या डब्यांत जाऊन बसला.

पण आपल्याला अजून तिचं नांवसुद्धां कळलेलं नाहीं ही रुखरूख त्याच्या मनांतून कांहीं केल्या जाईना. आपल्या पुण्याच्या दहा वीस दिवसांच्या मुक्कामांत ही नवी गुलजार ओळख वाढविलीच पाहिजे असं त्याला वाटत होतं. पण ही मुलगी कुणाची कोण, ही कुठं राहाते, हिचं नांव काय, इत्यादि गोष्टी कळल्यावांचून ओळख वाढवायचा प्रयत्न तो कसा करणार होता ? पुण्याचं स्टेशन यायच्या आंत काय वाटेल तें करून तिच्याशीं चार शब्द बोलायचेच, असं त्यानं मनाशीं ठरविलं.

घोरपडी स्टेशन आल्याबरोबर तो खालीं उतरला. गार्ड नाहीं गार्डाचा बाप जरी बायकांच्या डब्यापाशीं उभा असला तरी आतां कचरायचं नाहीं असा त्याच्या मनाचा निश्चय झाला होता. वेळप्रसंगीं कुस्तीसुद्धां करायला त्यानं आज मागंपुढं पाहिलं नसतं. त्याच्या मनांतला हा धाडसी निश्चय कळल्यामुळंच कीं काय, गार्ड पार शेवटच्या डब्यापाशीं एका पोर्टरच्या मागं लपला होता. लपला होता म्हणजे भाल्याला दिसत नव्हता.

डब्याजवळ जाऊन खिडकीशीं रेलून तो म्हणाला, " आतां पुढचं स्टेशन पुणं कीं ! "

आपले केस नीटनेटके करण्यासाठीं त्यांवरून दोन्ही पंजे फिरवीत ती मुलगी म्हणाली, " हो ना. "

" तुम्हांला न्यायला येणार आहे का कोणी स्टेशनवर ? नसेल येणार तर...."

" येणार आहेत तर. "

येणार आहेत ?...

म्हणजे हिचं...आधींच झालेलं आहे कीं काय ! छे, गळ्यांत काय म्हणतात तें तर दिसत नाहीं !

भाल्या हसत पुढं म्हणाला, " बरं आहे, ओळखदेख ठेवा. तुमचं घर कुठंसं आहे ? मला पुण्याचे रस्ते फारसे माहीत नाहींत. पण तुम्ही खूण सांगितलीत तर येईन भेटायला."

त्याबरोबर ती घाबरून म्हणाली, " अय्या ! मला भेटायला ? नको बाई ! "

" तें कां ? "

काय उत्तर द्यावं तें तिला चटकन् सुचलं नाहीं. पण मग ती म्हणाली,

" आमच्या बाबांना आवडायचं नाहीं. ते फार जुन्या मताचे आहेत. संस्कृतिरक्षक महामंडळाचे अध्यक्ष आहेत ते. परवां त्या ' राधाकृष्ण ' चित्रपटाचा निम्मा भाग सेन्सारकडून कापून घेतला त्यांनीं चळवळ करून. तुम्हीं वाचलंच असेल कीं तें सगळं ? "

" म्हणजे ! जनूभाऊ जुनेरे हे तुमचे वडील म्हणतां ? "

कोयनेलची गोळी खाल्ल्यासारखं तोंड करून तिनं मान हालविली.

भाल्या म्हणाला, " छे, तुम्ही तशा मुळींच दिसत नाहीं. "

" आता काय सांगावं बाई ! "

" तुमचं नांव सांगा."

इतक्यांत गाडीची मोठी शिटी आणि गार्डची लहान शिटी झाली. आणि नांव सांगण्याऐवजीं ती त्याला म्हणाली,

" अगबाई, गाडी चालू झाली ! बसा, बसा जाऊन आपल्या डब्यांत. "

भाल्या धावला खरा, पण तीव्र निराशेनं त्याचे पाय जड झाले होते. त्याचं हृदय तर जाग्यावर होतं कीं नाहीं कुणास ठाऊक ?

पुण्याच्या स्टेशनवर तिला पाहण्याचा त्यानं प्रयत्न केला; पण उतारूंच्या गर्दींत ती त्याला दिसली नाहीं.

अगदीं उदास मनानं तो एका टांग्यांत बसला.

टांगेवाल्यानं विचारलं, " कुठ जायचं रावसाहेब ? "

तो म्हणाला, " आता कसला कुठं जातोस बाबा ? ने तुझी इच्छा

होईल तिकडे. डेक्कन जिमखान्याकडे ने झालें. ”

* * * *

नंतरच्या पांचसहा दिवसांतल्या भाल्याच्या अवस्थेचं काय वर्णन करावं ? पाण्याबाहेर काढलेल्या मासळीमारखा तो तळमळत होता. खाण्यापिण्याकडे त्याचं अजिबात लक्ष नव्हतं. सकाळीं लवकर उठून ‘ लकी ’ रेस्टॉरंटमध्यें जाऊन तो बटर–टोस्ट अन् चहा घेई, तों पुन्हा अकरा वाजेपर्यंत कांहींएक खात नसे. आणि दुपारीं व रात्रीं तो जे चार घास घशाखालीं कसेबसे ढकली त्यापलीकडे अगदीं लख्ख उपाशीं राहात असे. त्याचं चित्तच ठिकाणावर नव्हतं त्याला तो काय करणार ? आग-गार्डांतल्या धाडसी चोऱ्यांच्या पुष्कळ हकीकती त्यानं पूर्वी ऐकल्या होत्या, पण आपल्या हृदयावर आगगार्डांत एका मुलीकडून दिवसा ढवळ्या दरोडा पडेल याची त्याला कल्पना नव्हती. बरं, तिनं चोरलेला माल आपल्याबरोबर तरी घेऊन जायचं; पण तसहि तिनं केलं नव्हतं. घरांतल्या सामानाची नासधूस करून निघून जाणाऱ्या चोरट्याप्रमाणं त्याच्या ‘हृद-याचे तुकडेतुकडे करून ते तसेच टाकून ती खुशाल चालती झाली होती ! ते तुकडे छातीखालच्या डाव्याउजव्या बाजूंना इकडेतिकडे हालत असलेले त्याला क्षणोक्षणीं जाणवत होते. ते तुकडे पुन्हा कसे सांधले जाणार तें एक परमेश्वरालाच माहीत होतं ! सध्या त्याचं चित्त अगदीं हैराण झालं होतं एवढं खरं. आणखी ज्या धंद्यासाठीं पुण्यास दहावीस दिवस राहायचं त्यानं ठरविलं होतं, त्यांतहि त्याला आतां अगदीं स्वारस्य वाटेनासं झालं होतं. वास्तविक त्याला रेडिओ सेटच्या पांचदहा ऑर्डर्स थोडयाशा खटपटीनं मिळण्यासारख्या होत्या; पण आतां त्याच्यानं तें काम होणं शक्य नव्हतं. त्याला एकच ध्यास लागला होता–आगगार्डांत भेट-लेली ती सुंदर मुलगी पुन्हा आपल्याला केव्हां भेटेल ?

त्यानं चारपांच दिवस कसेबसे काढले आणि मग एके दिवशीं रात्रीं अंथरुणावर तळमळत असतां त्यानं मनाशीं ठरविलं, कीं वाटेल तें झालं तरी सकाळीं उठल्यावर जनूभाऊ जुनेऱ्यांच्या घरीं जायचं आणि त्यांच्या मुलीची भेट घ्यायचा आटोकाट प्रयत्न करायचा.

या निश्चयाप्रमाणें तो खरोखरच दुसऱ्या दिवशीं जुनेऱ्यांच्या घरचा पत्ता काढीत तिथं जाऊन पोंचला. तो अंगणांत गेला तों ओटीवरच्या झोपाळ्यावर सुमारें वीस वर्षांचा एक मुलगा झोके घेत बसला होता. त्यानं भाल्याला विचारलं, "कोण पाहिजे ?"

आतां "ती पाहिजे" म्हणून थोडंच भाल्याला सांगतां येणार ? तो म्हणाला, "जुनेऱ्यांचं घर हेंच ना ?"

"होय."

"आहेत कां घरांत ?"

"कोण ? आमचे बाबा होय ?"

"हं."

"नाहींत. 'व्याघ्रमुखी' पत्राच्या कचेरींत गेले आहेत. पण येतीलच आता इतक्यांत. बसा तुम्ही वाटलं तर. इथं झोपाळ्यावर बसतां ! का वर माझ्या खोलींत जाऊं या. चला कीं."

मोठा लाघट दिसतो हा मुलगा, असं मनाशीं म्हणत भाल्या त्याच्या मागोमाग गेला.

खोलींत गेल्यावर तो मुलगा म्हणाला, "बसा ना. संकोच नका करूं. माझं नांव भावड्या. आमच्या बाबांचा मुलगा मी. ही घ्या, सिगरेट घ्या."

आपण भलत्याच घरांत तर आलों नाहीं ना, अशी शंका भाल्याच्या डोक्यांत येऊन गेली. कारण ज्या खोलींत तो बसला होता तिच्या चारी भिंतींवरची एक इंचसुद्धां जागा देशीविदेशी नटींच्या फोटोंवांचून मोकळी राहिलेली दिसत नव्हती. एका उंच टेबलावर आरशापुढं ब्रिल्यिंटाइन क्रीम, स्नो, लव्हेंडर अशा बाटल्या मांडलेल्या होत्या. कोपऱ्यांत सातआठ बुटांच्या जोड्या पडलेल्या होत्या. एका मोठ्या आकाराच्या कॅलेंडरवर एक स्त्री अंगावरचं अखेरचं वस्त्र उतरून ओढ्याच्या पाण्यांत उतरत होती. एका लहानशा टेबलावर पांचसहा इंग्रजी पुस्तकं जुळवून उभीं केलेलीं होतीं, त्यांत 'मिस्टरीज् ऑफ लंडन,' 'लेडी चॅटर्लीज् लव्हर्स' अशीं पुस्तकं प्रामुख्यानं दिसत होतीं.

त्या एकंदर थाटाकडे पाहात असतां भाल्याच्या मनांत काय विचार येत असावेत तें जणू कांहीं ओळखून भावड्या म्हणाला,

" त्याचं असं आहे मिस्टर, आमचीं अन् आमच्या बाबांचीं मतं बिलकुल जुळत नाहींत. वडिलोपार्जित चांगली इस्टेट आहे आमची, ती काय सारी भस्म अन् रुद्राक्ष विकत घेण्यांत घालवायची ? अहो, आधुनिक काळाला योग्य असं राहावं, माणसानं मजा करावी, असं आम्हां तरुण मुलांना नाहीं वाटायचं तर कुणाला वाटायचं ? पण ही साधी गोष्ट कांहीं आमचे बाबा लक्षांत घ्यायला तयार नाहींत. बसले आहेत संस्कृतिरक्षक महामंडळ काढून, अन् करीत असतात नेहमीं कांहींतरी हास्यास्पद चळवळ. परवांच बघा त्या ' राधाकृष्ण ' चित्रपटावर त्यांनीं हल्ला चढविला अन् त्यांतला गोपींचा सारा भाग कापून काढला सेन्सॉरकडून. त्या चित्रपटांत काय थोडी बहार होती ती तेवढ्याच भागांत. पण यांनीं केला त्याचा सत्यानास ! आणखी म्हातारी मेल्याचं दुःख नाहीं, पण काळ सोकावतो म्हणतात ना, तसं झालं आहे. परवांचा एक विजय मिळाल्याबरोबर आतां काय कापूं अन् काय नको असं होऊन गेलं आहे महामंडळाच्या सभासदांना. छोट्या जॉर्ज वॉशिंग्टनच्या हातांत कुऱ्हाड मिळाली तेव्हां त्याच्या अंगांत जसं अवसान शिरलं ना, तसं शिरलं आहे यांच्या अंगांत. आतां जो जो नवा चित्रपट निघेल त्याच्यामागं कात्री घेऊन लागायचा विचार आहे त्यांचा. पण घरांत आमच्यापुढं मात्र कांहीं चालत नाहीं हं आमच्या बाबाचं. लहान होतों तेव्हां केली घोकंपट्टी रुद्राची अन् तासंपट्टी डोक्याची; पण आतां आम्ही ऐकणार होय ! ऊः ! "

सिगारेटचा धूर सोडीत भावड्यानं विलक्षण अभिनय केला.

भाल्या त्याच्याकडे पाहातच राहिला. एक तर संस्कृतिरक्षक महामंडळाच्या एका आधारस्तंभाच्या घरचा देखावा पाहून तो आश्चर्यानं थक्कच झाला होता, आणि शिवाय आपल्यापुढं जी ही मूर्ति बसली आहे ती आपल्या हृदयस्वामिनीच्या भावाची मूर्ति असेल यावर त्याचा झटकन् विश्वासच बसेना.

हा तिचा भाऊ आहे !

कुणीकडे तिचा केतकीसारखा वर्ण आणि कुणीकडे याचा काळसर निळा कीं निळसर काळा तें ठरवितांना डोळ्यांना चक्कर आणणारा तेलकट रंग ! कुणीकडे तिचं सरळ सुंदर नाक, आणि कुणीकडे केवळ नाकाच्या जागीं आहेत म्हणूनच त्या नांवावर हक्क सांगणारीं याचीं दोन फेंदारलेलीं भोकं ! कुणीकडे तिच्या सुंदर दंतपक्ति आणि कुणीकडे म्यानांतून उपसलेल्या तरवारीसारखे दिसणारे याचे हे तिरपे दात ! तिचा बांधा किती कृश, आणि वटवृक्षाच्या बुंध्यासासारखा याचा बांधा केवढा !

ती याची बहीण !

पण असेलहि बुवा. निसर्ग काय काय चमत्कार करील त्याचा काय नियम ?

भावड्यानं त्याला विचारलं, " आमच्या खोलीची सजावट तुम्हांला कशी काय आवडली ? तो कोपऱ्यांत फोनोग्राफ पाहिलांत का ? अगदीं 'बेस्ट' पैकीं आहे. रेकॉर्डसुहि आहेत आपल्याकडं बरं का. ' फिरवाना जरा डोळा ' ' तुम्हिने मुझको प्रेम सिकाया ' अशा अगदीं निवडक निवडक ! ऐकत्रं का तुम्हांला ?

भाल्याची धंदेवाईक दृष्टि एकदम जागृत झाली आणि तो म्हणाला, " पण भाऊराव, फोनोग्राफची फॅशन जुनी झाली आतां. तुम्ही एक झक्क-पैकीं रेडिओसेट घ्यायला पाहिजे. मी तुम्हांला अगदीं उत्तम सौदा करून देतों. युनिव्हर्सल रेडिओचा मी सेल्समन आहें. "

" असं का ? म्हणजे हेंच का तुमचं काम होतं बाबांशीं ? "

" नाहीं. त्यांच्याशीं माझं निराळंच खाजगी काम आहे. पण अनायासं परिचय झाला तेव्हां म्हटलं—हे बघा दोनतीन कॅटलॉग. "

असं म्हणून भाल्या आपली बॅग उघडूं लागला.

पण तितक्यांत खाली अंगणांतल्या फरशीवर सोटा वाजल्याचा आवाज आला आणि तो ऐकतांच भावड्या म्हणाला, " आले, आले ! "

भाल्यानं विचारलं, " कोण ? "

" आमचे बाबा. चला, मी तुम्हांला त्यांच्या खोलींत घेऊन जातों."

भाल्या उठला आणि त्याच्या मागोमाग गेला.

जनूभाऊंच्या खोलींत पेशवाई बैठक होती. त्यामुळं त्यांनीं जरी त्याला नमस्कार करून " या, बसा " म्हटल, तरी सुटाबुटांतल्या भाल्याला कुठं बसायचं तें कळेना ! एका बैठ्या स्टुलावर पानतंबाखूचं तबक ठेवलं होतं त्याला पदच्युत करून तो त्या स्टुलावर कसा तरी बसला.

जनूभाऊंच्या खोलीचा थाट किती निराळा होता ! झाशीची राणी आणि अहिल्याबाई एवढ्याच काय त्या स्त्रिया भिंतीवरच्या तसबिरींत होत्या. बाकी साऱ्या तसबिरी पेशवाईच्या काळांतल्या, गुडघे टेकून कसलं तरी फूल हुंगीत बसलेल्या पुरुषांच्या ! एका कोपऱ्यांत जुन्या बखरींचीं दप्तरं पडलीं होतीं. कोनाड्यांतल्या पुस्तकांत ' वेदार्थदीपिका, ' ' चतुःसूत्री-सार ' ' शांकरभाष्य, ' ' सचित्र महाभारत ' इत्यादि जाडजाड ग्रंथांची दाटी झाली होती.

भाल्यानं खोलीची पहाणी पुरी करायच्या आधींच जनूभाऊंनीं प्रश्न केला, " हं, काय काम आहे आपलं ? "

" माझं होय ? अं...तसं कांहीं काम नाही. "

" सांगा कीं. संकोच कसला करतां ? "

भाल्यान संकोच केला नसता; पण केवळ कपाळावरच नव्हे, तर तुळंतुळीत टाळूवरसुद्धां गोपीचंदनाचं गंध धारण करणारी, दाट मिशांची, गणपतीसारख्या बारीक डोळ्यांची, पेशवाई अंगरखा चढविलेली ती काळीकुट्ट अगडबंब मूर्ति पाहून तो चांगलाच बावरून गेला होता. त्याच्या मनांत पुनःपुन्हा येत होतं, भावड्यासारखं पुत्ररत्न या पुरुषश्रेष्ठाच्या पोटींच काय तें येणं शक्य आहे हें उघड आहे. पण याच्या पोटीं ती ? पण पुन्हा त्याचं मन म्हणालं, असेल बाबा. कदाचित् ती आईच्या वळणावर गेली असेल. या घरांतली गृहिणी जोंपर्यंत तूं पाहिली नाहींस, तोंपर्यंत कां उगीच शंकेनं कासावीस होतोस !

तो अशा विचारांत मग्न असतांना जनूभाऊंनीं आपल्या घोगऱ्या आवाजांत पुन्हा विचारलं, " काय काम आहे आपलं ? "

" जरा खाजंगी आहे. "

" मग सांगा कीं. भावड्या मघांशीच गेला. "

" हो, पण..."

" पण काय ? अहो, सांगा कीं काय सांगायचं तें ? "

" अं, त्याचं असं झालं, परवां मी पुण्याला येत होतों तेव्हां आगगाडींत—"

" हूं ! "

" आपल्या मुलीची अन् माझी ओळख झाली. "

" आमच्या मुलीची म्हणतां ? होय, परवां ती आली खरी ठाण्याहून."

ठाण्याहून ? भाल्या चमकला ! पण आपलं आश्चर्य प्रकट न करतां तो म्हणाला, " हो हो, गाडींत भेटल्या त्या मला. "

" असं का ? माझ्याजवळ कांहीं बोलली नाहीं. काय वस्ताद आहे पिली ! "

पिली ! तें नांव ऐकतांच भाल्याच्या मनाला चांगलाच चरका बसला. कारण त्याच हृदय चोरून नेणाऱ्या त्या वाष्परथनिवासिनी लावण्य-खनीचीं जीं नांवं त्यानं कल्पनेनं ठरविलीं होतीं तीं किती नाजुक, लुस-लुशीत अन् मधुर होतीं ! कुसूम, विमल, सुनेत्रा, चारुलता, मेनका, लीला—अशींच कितीतरी ! तीं सारीं दूरच राहून हें कुठलं गांवठी नांव त्याच्या कानीं पडत होतं !

पण त्यानं विचार केला, गुलाबाला कुठलंहि नांव दिलं तरी तो गुलाबच ना ?

तो म्हणाला, " हो वस्ताद आहेत खऱ्या त्या ! त्यामुळंच तर त्यांच्या ओळखीपासून मला फार आनंद झाला. अन् म्हटलं, गाडींत ओळख-देख झाली आहे ती वाढवितां आली तर वाढवावी. "

तितक्यांत खालच्या माजघरांतून पेटीचे अन् गाण्याचे सूर आले. ते ऐकून भाल्यानं विचारलं, " हं...कोण त्याच वाजविताहेत वाटतं ? "

" नाहीं, ती नाहीं. तिची धाकटी बहीण—बनी. "

बनी? रामराम! काय रे देवा ही नांवं! आपल्या सोन्यासारख्या सुंदर कन्यकांना असलीं हेंगाडीं नावं देणाऱ्या या पितृदेवाला काय म्हणावं?

पण नांवाचा विचार मनावेगळा करून भाल्यानं प्रशस्तिपत्र दिलं,

" वा, सुंदर म्हणताहेत कीं!"

" अहो, अवघी नऊ वर्षांची आहे."

भाल्याच्या मनांत आलं, नऊ वर्षांची बनी जर इतकी सुदर गाते, तर अटरा वर्षांची पिली निदान दुप्पट सुंदर तर गात असेल!

आधींच लुब्ध झालेल्या त्याच्या मनाचा आतां अगदीं पक्काच निश्चय झाला. पिलीला मागणी घालण्याचं धाडस करण्यांत आतां अगदीं विलंब करतां कामा नये असं त्यानं ठरविलं. तो म्हणाला,

" मी आतां जास्ती आढेवेढे न घेता माझ्या मनांतला हेतु सरळच सांगतों. मी युनिव्हर्सल रेडिओचा मुख्य सेल्समन आहें. महिन्याकांठीं दीडशें रुपये तरी सहज मिळवितों. मी शरिरानं अगदीं सुदृढ आहें. अन् नाकींडोळीं विशेष देखणा नसलों तरी चारचौघांसारखा आहें हें आपण पाहातांच. मला येत्या फाल्गुनांत सत्ताविसावं वर्ष लागेल. मला आईबाप नाहींत. पण—"

जनूभाऊंनीं मधेंच विचारलं, " अहो, पण ही सारी कुळकथा तुम्ही मला काय म्हणून सांगतां?"

" येतच होतों मी त्या मुद्यावर. आपल्या मुलीवर इंग्रजींत ज्याला " लव्ह ॲट फर्स्ट साइट " म्हणतात अन् मराठींत ज्याला ' एका झट-क्यांत प्रेम ' म्हणतां येईल तसं माझं प्रेम जडलेलं आहे. आपली जाहीर भूमिका पाहातां प्रीतिविवाह आपल्याला पसंत असेल कीं नाहीं याची शंका आहे मला. पण आपण विचार करा, शंकरानं पार्वतीशीं प्रीति-विवाहच लावला ना? श्रीकृष्णांनीं रुक्मिणीशीं, अर्जुनानं सुभद्रेशीं, इतकंच काय, ब्रह्मदेवानं—"

" अरे बाप रे! तुम्ही ब्रह्मदेवाचं लग्न लावायच्या बेतांत आहांत कीं काय? अहो, त्यानं कधींहि कुणाशीं..."

" लग्न लावलं नाही असं आपलं म्हणणं ना ? पण त्याचे इतर घोटाळे काय कमी होते ? त्यांवरूनच तर ' ब्रह्मघोटाळा ' हा शब्द रूढ झाला आहे. हं, तेव्हां मी आपल्याला काय सांगत होतों, अहं, सांगत नव्हतों, विनंती करीत होतों, ती अशी, कीं कसंहि करून आपल्या कन्येला मी घालीत असलेली ही मागणी—"

" मान्य करा इतकंच कीं नाहीं ? हाः हाः हाः ! किती तुमचे हे आढेवेढे आणि किती प्रस्तावना ! अहो, जाहीर मतं अन् खाजगी वर्तन यांचा काय संबंध असतो ? आमच्या पिलीला एखादं चांगलं स्थळ कसं मिळेल या विवंचनेंतच मी आहें. तुमची मागणी ऐकून मला फारफार आनंद झाला. थांबा, पिलीलाच मी इकडे बोलावतों आणखी विचारतों, ' काय ग लबाडे, आमची काळजी तूं अशी परस्परच संपवलीस काय ?' पिले, ए पिले ! "

अशा हाका मारीत जनूभाऊ आंतल्या जिन्याच्या तोंडाशीं गेले आणि तिथून पुन्हा ओरडले, " अग ए, पिलीला जरा वर पाठव. लवकर बरं का. वर दोन कप चहा पाहिजे. तो घेऊन पिलीलाच येऊं दे. "

नंतर पांचदहा मिनिटांतच जिन्याच्या बाजूनं कपबशांचा आवाज भाल्याला ऐकू आला.

त्यानं आपल्या कोटाच्या बाह्या झटकन् साफ केल्या, गळ्यापासली नेकटायची गाठ हालवून नीट केली आणि खिशांतला कंगवा काढून केसांवरून फिरवायच्याहि विचारांत तो होता, पण जनूभाऊंच्या समक्ष असली साफसफाई आपण केली तर सारंच मुसळ केरांत जाईल, अशा भीतीनं त्यानं तो बेत रहित केला.

आपली प्रिया चहाचा ट्रे हातांत घेऊन दारांत आलेली दिसतांच तिच्याकडे पाहून कितपत हास्य केलं असतां या वेळीं खपेल याचा हिशोब तो मनाशीं करूं लागला.

त्याचा तो हिशेब पुरा झाला नव्हता तोंच त्यानं आवरलेली त्याची दृष्टि अनावर होऊन मधल्या दाराकडे वळायला आणि पिली दारांत

येऊन पोंचायला एकच गांठ पडली ! आणि त्या क्षणीं त्याला जें दृश्य दिसलं तें पाहतांच त्यानं किंचाळी फोडली—" ही कोण ? "

जनूभाऊ म्हणाले, " आमची पिली ती हीच कीं. "

पिली ! हत्तीचं एक लहानसं पिल्लूच होतं तें !

भाल्या पुन्हां ओरडला, " छे, छे, ती ही नव्हे. अहो, हिला बायकांच्या डब्यांत कोण बसूं देईल ? मालाच्या वाघिणींतच शोभेल ही. आणखी ही गाडींत असल्यावर गाडी चालणार होय ? अहो जनूभाऊ, मी चारी वेदांची शपथ घेऊन सांगतों कीं, माझ्या ओळखीची झाली म्हटलं ती ही नव्हे. मला हा चहा नको. नमस्कार ! "

असं म्हणून आपली कातडी बॅग उचलून भाल्या जो सटकला तो जिन्याच्या सगळ्या पायऱ्यांवरून एकाच उडींत अंगणांत उतरला.

वरून खिडकींतून डोकावून जनूभाऊ ओरडले, " अहो, असे जातां काय ? या ! अरे महादू, त्यांना म्हणावं—"

भावड्याहि आपल्या खोलींतून ओरडला, " अहो मिस्टर. तुम्ही रेडिओसेट देणार ना मला ? मग पळतां कुठं ? या, या ! अरे महादू– "

भाल्यानं धावतांधावतां मान वळवून वर एक कटाक्ष टाकला, तों पिलीहि एका खिडकींतून वाकून गड्याला ओरडून सांगत होती, " अरे महादू, थांबव त्यांना ! "

औरंगजेबाच्या दरबारांतून निसटणाऱ्या शिवाजीच्या शिताफीनं भाल्यानं जनूभाऊंच्या घराच्या दिल्ली दरवाजांतून उडी ठोकली आणि रस्त्याला लागतांच तो धावत सुटला. त्याची कल्पना आपला पाठलाग खचित होतो आहे. " अरे महादू, थांबव त्यांना, पकड त्यांना. " अशा जुनेरे घराण्याच्या दोन पिढ्यांच्या आरोळ्या कानांवर येत असल्याचा त्याला स्पष्ट भास होत होता. मध्येंच रस्त्यावरचा एक इसम ओरडला, " अरे, बॅग घेऊन पळतो आहे. भामटा रे भामटा ! " आणि त्याचं तें ओरडणं ऐकून खरोखरच सातआठ लोक त्याच्यामागून धावूं लागले.

भाल्या आतां भीतीनं अगदीं बेहोष झाला. पुरुष, स्त्रिया, मुलं, साय-

कली, टांगे—कोणतीच वस्तु त्याच्या नजरेला नीट दिसेना. शक्य तितक्या वेगानं पळायचं एवढं एकच भान त्याला उरलं.

आणि त्यामुळं अखेर एका कोपऱ्यावर आडव्या रस्त्यानं आलेल्या एका सायकलस्वाराची अन् त्याची जोराची टक्कर झाली !

लगेच लोकांचा मोठा थवा त्याच्याभोंवतीं जमला. कुणी म्हणाले, " भामटा आहे, द्या त्याला पोलिसांच्या ताब्यांत. " कुणी म्हणाले, नाहीं रे, चांगला सभ्य दिसतो आहे. " कुणीसं म्हणालं, " अरे, पाहतां काय ? त्याच्या डोक्याला खोक पडली आहे रे. उचला बिचाऱ्याला. " एकानं सुचवलं, " अरे, आंत या घरांत घेऊन जाऊं त्याला. डॉक्टर कुलकर्ण्यांचं हें घर. डॉक्टर असतीलच घरांत. "

शुद्धीवर येतांच भाल्या दचकून ओरडला, " अहो, ही ती नव्हे हो ! मला चहा नको. सोडा मला. "

तो अंथरुणावरून उठूं लागला. कुणी तरी त्याचा प्रतिकार केला आणि म्हटलं,

" उंहं, तुम्ही अगदीं निपचित पडून राहायला पाहिजे. काका जातांना सांगून गेले आहेत कीं—"

काका ?—

म्हणजे तो जनूभाऊंच्या घरांत नव्हता तर ?...

आणि हा गोड शब्द...?

भाल्यानं आपले डोळे अगदीं ताठ उघडले आणि पाहातो तों त्याच्या कॉटजवळ दुसरं कोण उभं होतं ? जिच्यासाठीं त्याचं अन्तःकरण आज पांच दिवस तळमळत होतं तीच आगगाडींत भेटलेली ती...

तो हसून म्हणाला, " तुम्ही कुठं इथं ? "

ती हसून म्हणाली, " कुठं म्हणजे ? माझ्या घरांत मीं असूं नये ? "

" तुम्हीं तर सांगितलंत् कीं जनूभाऊ जुनेरे हे तुमचे वडील. "

ती मोठमोठ्यानं हसून म्हणाली, " तें खरं वाटलं तुम्हांला ? "

" तूं खोटं बोलशील ही काय कल्पना ? "

" तुम्ही खरोखरच माझ्या घरीं हेलपाटे घालायला लागाल अशी भीति वाटली, म्हणून मीं दिली ती थाप ! "

" छान केलंस ! तुझी थाप माझ्या कपाळावर कशी उठली आहे बघ. "

" बाई बाई ! मला काय माहीत माझ्या बोलण्याचा असा विपरीत परिणाम होईल म्हणून ? आतां मला फार वाईट वाटतं त्याबद्दल. मला क्षमा करा हं. "

असं म्हणत खालीं वाकून तिनं त्याच्या मस्तकावर आपला उजवा हात अलगद टेकला.

तिच्या नजरेला नजर लावून त्यानं म्हटलं, " पण बघ आतां मी तुझ्या घरांत कसा शिरलों तें. आतां तूं कशी बाहेर काढशील मला ? "

तिनं लाजून मान किंचित् फिरविल्यासारखं केलं व म्हटलं,

" इश्श, पण बाहेर काढायचं म्हणतं आहे कोण ? "

तितक्यांत भाल्याला एक आठवण झाली आणि त्यानं विचारलं, ' आतां तरी तुझं नांव सांगशील का ? "

" म्हणजे ? त्या दिवशीं नाहीं का मीं सांगितलं ? "

" चांगलं ! त्या दिवशींच तें सांगितलं असतंस तर त्या पिलाजी-रावांशीं चार हात करून घ्यायसाठी कशाला गेलों असतों मरायला ? हं सांग, नांव सांग तुझं ? "

" माझं नांव लीला. "

" वाटलंच होतं मला. नन्तरसुद्धां हेंच नांव ठेवणार मी कायम ! "

" नन्तर म्हणजे ? "

" ओहो, काय पण आठ्या त्या कपाळाला ! "

" आतां मात्र मी इथं थांबणार नाहीं बरं का. " असं म्हणून लीला झटकन् आंतल्या खोलींत निघून गेली.

भाल्या किती वेळ तरी ज्या दारांतून ती आंत गेली त्या दाराकडे सारखा पाहात राहिला.

त्याच्या हृदयाचे सगळे तुकडे एकदम सांधले गेले होते ! इतकंच नव्हे तर दुसरं एक हृदय आपल्या हृदयाशीं सांधलं गेलं आहे अशा गोड जाणीवेनं त्याचा ऊर अगदीं भरून आला होता...

आंतल्या खोलींत लीलानं रेडिओ सुरू केला होता, त्यांतून गाण्याचे स्वर निघत होते.

" आला खुषिंत समिंदर
त्याला नाहीं धिर......"

---

# जटादंड-मंडळाचा पराक्रम पहिला व अखेरचा : : ४

आमच्या गांवीं 'नवमतविध्वंसक जीर्णमतप्रतिपालक जटादंड-मंडळ' ज्या दिवशीं स्थापन झालें, त्या दिवशीं गांवांत जिकडेतिकडे एकच हलकल्लोळ उसळला होता. कारण, होळीचा दिवस होता तो !

पंचाननशास्त्र्यांनीं आपल्या 'जटादंड-मंडळा'च्या स्थापनेसाठीं तो दिवस मुद्दामच योजला होता. गांवांतल्या एका पेशवाईतल्या जुनाट वाड्याच्या चौकांत तिन्हीसांजांच्या वेळीं धडधडणाऱ्या होळीभोंवतीं जमलेल्या मंडळाच्या सभासदांना उद्देशून भाषण करतांना पंचाननशास्त्री म्हणाले,

"मित्रहो, आपल्या या जटादण्डमंडळाच्या प्राणप्रतिष्ठेचा ठराव आपण सर्वांनीं आजच्या या आर्यधर्मीय महोत्सवाला साजेलशा ध्वनीनं पसार केला याबद्दल मला फार फार आनंद होत आहे. आजपर्यंत हजारों सभांत हजारों ठराव नुसते हात वर करून अगर नुसत्या आरोळ्यांनीं पसार

झाले असतील; पण, हस्तमुखसंयोग होऊन त्या उच्च रवांत पसार होणारा आपला हा ठराव खरोखरच आधुनिक हिंदुस्थानच्या इतिहासांत होळीच्या राखेनं लिहून ठेवण्याच्या योग्यतेचा ठरेल ! कोणताहि संकल्प अग्निदेवतेला साक्षी ठेवून करण्याची आपली वैदिक परंपरा आपण साधली आहे. तेव्हां आपल्या मंडळाच्या कार्याला अभूतपूर्व यश मिळेल यांत संशय नाहीं. आपला समाज अधोगतीला चालला आहे. तरुण मुलगे केस राखताहेत, अन् तरुण मुली केंस कापताहेत ! पुरुषांनीं खाण्यापिण्यांत ताळतंत्र ठेवलेला नाहीं. स्त्रियांना कासोट्याची पर्वा राहिलेली नाहीं ! कोणाचं लग्न कोणाशीं होईल त्याचा नेम राहिलेला नाहीं ! आणखी संततिनियमनाच्या चर्चेची स्त्रीपुरुषांना लाज उरलेली नाहीं ! सारांश, नवमतांच्या आक्रमणामुळं आपला वैदिक आर्य धर्म सर्वस्वीं नष्ट होतो कीं काय अशी भीति उत्पन्न झालेली आहे; आणि त्या धर्माचे जे अभिमानी असतील त्यांनीं पुराणमतरक्षणाचा आटोकाट प्रयत्न करण्याची वेळ आलेली आहे. आपण पुराणमताचे बडेबडे अभिमानी माझ्या निमंत्रणाला मान देऊन इथं उपस्थित झालांत, आणि आपलं हें ' जटादण्ड—मंडळ ' प्रास्थपित केलंत हें पाहून मला परम संतोष वाटतो. आपल्या सर्वांचे परम स्नेही आयुर्वेदपटु मोरभट इथं उपस्थित आहेत. त्यांच्या कारखान्यांतला ' मोरभटांचा मोरावळा ' अखिल भरतखंडांत प्रसिद्ध आहे. त्यांच्या मोरआवळ्याइतकींच त्यांचीं मतंहि जुनाट आहेत. त्याचप्रमाणं अस्सल पेशवाई थाटाचीं पक्वान्नं करण्यांत ज्यांचा हात पुण्याचे आचारीदेखील धरूं शकणार नाहींत, असे आपल्या गांवांतल्या साऱ्या सहस्रभोजनाचे आधारस्तंभ व्यंकोबा, रोज नेमानं लघुरुद्र करणारे रुद्रंभट-लोकांचे जुने दागिने आडगिऱ्हाइकीनं घेणारे सराफी धंद्यांतले अंताजी, राव, मधल्या आळींतले येसूनाना—अशी बडीबडी मंडळी आपल्या ' जटादण्डमंडळांत ' सामील झाली, हें वृत्त वाचून नवमतवाद्यांच्या छातींत खचित धडकी भरेल ! आणि आपल्या गणपुलेशास्त्र्यांचा गणू हा तर आपल्या मंडळांतलं अमोलिक रत्न आहे बरं का ! तो नुकताच एम्. ए. झालेला आहे. समाजशास्त्राबरचीं शेंकडों इंग्रजी बुकं त्याच्या नजरेखालून

गेलीं आहेत. कितीतरी फ्रेंच ग्रंथकारांचीं नांवं त्यानं मुखोद्गत केलीं आहेत, अन् तो पट्टीचा वक्ता व लेखक आहे ! अशा इंग्रजी विद्यापारंगत तरुण गृहस्थानं स्मश्रू करावी, घवघवीत आडवं गंध लावावं, पेशवाई जोडा वापरावा, अन् चहा घ्यायचा झाला तर तो या कानाचा त्या कानाला कळूं नये इतक्या दक्षतेनं घ्यावा, या साऱ्या गोष्टी कौतुक करण्यासारख्या नाहींत असं कोण म्हणेल ? आपल्या मडळाचं कार्यवाहपद आपण गणूला—नव्हे, गणपणरावांना दिलं आहे, ही सर्वथैव उचित गोष्ट आहे. अस्तु. मी अधिक कांहीं बोलत नाहीं. आमच्या मंडळाच्या नियमाप्रमाणं उद्यांपासून सर्वांनीं जटा वाढवाव्यात, त्या वाढेपर्यंत गणूनं मुद्दाम खरेदी केलेले जटांचे टोप घालावेत, रुद्राक्षमाळा धारण कराव्या, आणि हातांत नेहमीं पेलेल तितका मोठा एक अजस्र दंड वागवावा, अशी मी आपणां सर्वांना पुन्हा विनति करतों. मंडळाच्या सर्व सभासदांनीं वल्कलं नेसावींत अशी एक सूचना मध्यें आली होती; परंतु त्यावर गणूचं म्हणणं असं पडलं, कीं त्यानं जीं नाटकं—सिनेमे पाहिले आहेत त्यांवरून त्याची अशी पक्की खात्री झाली आहे, कीं वासिष्ठ, विश्वामित्र, वाल्मीकि इत्यादि आपले ऋषि वल्कलं मुळींच नेसत नव्हते. ते चांगले रेशमी पितांबर नेसत असत ! त्याचा सदा काचा मारीत असत एवढंच ! म्हणून आपल्या मंडळाच्या सभासदांनींहि सदा काचा मारण्याची दक्षता ठेवून धोतर अगर पितांबर नेसायला कांहींच हरकत नाहीं. या सर्व गोष्टी सर्वांनीं ध्यानांत ठेवाव्या, आणि फिरून एकवार या अग्निदेवाच्या नांवानं हस्तमुखसंयुक्त महाध्वनि करून सभा विसर्जन पावली असं समजावं अशी मी विनंति करतों. ”

पंचाननशास्त्र्यांचें तें शेवटचें वाक्य संपतांच पुनमचंद मारवाड्याकडून स्वस्त भावांत आणलेल्या जुन्या वाशेळया तुपाचा एक डबा गणूनें होळीवर ओतला, आणि त्या झोतानें क्षणभर मंदावून होळी जेव्हां दुप्पट धडाडली तेव्हां सर्व सदस्यांनीं अगदीं मन लावून, आणि कुणीं एक तर कुणीं दोन हात तोंडाला लावून जंगी गर्जना केली !

ती गर्जना पुण्यापर्यंत क्वचित पोंचली असेल.

निदान यानन्तर थोड्याच दिवसांच्या अवकाशांत पुण्याहून जी एक विचित्र बातमी आमच्या गांवीं येऊन थडकली, तिच्यामुळें 'जटादण्ड-मंडळा'च्या सभासदांना जादा सभा बोलावून जादा ध्वनि करण्याची वेळ आली येवढं खास.

ती बातमी म्हणजे पुण्याच्या एका सुप्रसिद्ध कॉलेजचे माजी मुख्याध्यापक कै. सदाशिवराव सदावर्ते यांची सुशिक्षित मुलगी लतिका एका नाटकमंडळींत जाणार ही होय.

तुम्हीं म्हणाल लतिकेचा आणि आमच्या गांवचा काय संबंध? पण पहा कसा तो.

सदावर्त्यांचें मूळ घराणें आमच्या गांवचें. लतिकेच्या आजोबापर्यंत सदावर्त्यांच्या सार्‍या पिढ्या भिक्षुकींत गेल्या होत्या. ही भिक्षुकीची परंपरा प्रथम लतिकेच्या बापानें मोडली. लहान वयांत तो घरांतून पळून गेला, पुण्यास जाऊन इंग्रजी शिकला, पुढें विलायतेला गेला, मोठा पदवीधर झाला, एका मडमेशीं कांहीं भानगड केली होतीन् ती कशीबशी निस्तरून परत आला, अन् मुख्याध्यापक झाल्यावर इंग्रजी थाटानं राहूं लागला. म्हणजे सदावर्त्यांच्या शुद्ध आर्यधर्मीय रक्तांत लतिकेच्या बापापासून संकर झाला होता असेंच म्हणायचें. अन् आतां लतिकेनें तर कमालच केली होती!

ती नाटकांत जाणार ही बातमी आल्याबरोबर 'जटादण्ड-मंडळा'ची तातडीची सभा भरली, आणि पंचाननशास्त्री आवेशानें म्हणाले,

"सदावर्त्यांची ही लतिका मूळ आपल्या गांवची आहे. तिचा बुद्धिभ्रंश झाला आहे! तिचं रक्षण करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे! साम, दाम, दंड, भेद असे सारे उपाय योजून लतिकेला या नवमतवाद्याच्या मोहापासून परावृत्त करणं आपलं कर्तव्य आहे. त्यासाठींच आपलं हें मंडळ अस्तित्वांत आलेलं आहे. आजपर्यंत आपण जीर्णमतवादी लोक नुसते हातपाय आपटीत स्वस्थ बसलों तें पुष्कळ झालं. यापुढं आपण चढाईचं धोरण स्वीकारलं पाहिजे. नवमतवाद्यांवर हल्ले चढवले पाहिजेत. नुसते शब्दांचे नव्हत, प्रसंगीं दंडाचे सुद्धां! लतिकेला या मूर्खपणापासून

परावृत्त करण्यासाठीं पुण्यावर चाल करून जायचं आपण ठरवूं या. उद्यां सकाळीं ब्राह्ममुहूर्तावर मंडळाच्या सर्व सभासदांनीं बैलांच्या खटाऱ्यांत बसून पुण्याकडे प्रयाण करायचं! आपल्या मंडळाचे सभासद मूठभरच आहेत असं पुण्याच्या लोकांना वाटूं नये म्हणून आपल्या कार्यवाहांनीं, गणूनं एक फार नामी युक्ति काढली आहे. आपल्या मंडळाच्या प्रत्येक सभासदानं खोट्या कां होईना पण जटा धारण केलेल्या आहेत. तेव्हां जो जो जटाधारी असेल त्याला आपल्या मंडळाचा सभासद मानायला हरकत नाहीं. या हिशोबानं गणू आज आपल्या गांवांतले सारे बैरागी एकत्र करणार आहे! मग आपली संख्या बरीच मोठी होईल. पुण्यास पोंचल्यावर तिथंहि शेंपन्नास तरी बैरागी आपल्यांत सामील करून घ्यायचं गणूनं ठरवलं आहे! आपली ही पुण्यावरची स्वारी मोठी संस्मरणीय होणार आहे. गांधींनीं दांडीची मोहीम केली ती यापुढं कांहींच नाहीं! पुण्यास आपण पोंचलों, कीं प्रथम गणूला लतिकेकडे पाठविण्यांत येईल. तो नुसत्या वादविवादानंच तिला जिंकील आणि वठणीवर आणील. स्त्रियांनीं रंगभूमीवर काम करूं नये हें सिद्ध करण्यासाठीं भूमिति, बीजगणित, ज्योतिःशास्त्र, वनस्पतिशास्त्र आणि भूगर्भशास्त्र, यांतून कितीतरी भक्कम आधार त्यानं निवडून काढले आहेत! त्याच्याशीं वादविवाद करण्यांत लतिकेचा टिकाव लागणार नाहीं अशी माझी खात्री आहे. पण समजा, आपला हा सामाचा उपाय वायां गेला, तर दाम, दंड, भेद हे उपायसुद्धां करून पाहायला कचरायचं नाहीं, असा आपला निश्चय पाहिजे. आहे ना?—"

पंचाननशास्त्र्यांचा तो प्रश्न ऐकतांच सर्व सभासदांनीं होलिकामहोत्सवाची आठवण करून देणारा महाध्वनि करून चौक दणाणून सोडला!

दुसऱ्या दिवशीं 'जटादण्ड–मण्डळा'चे खरेखोटे सारे मिळून शंभर सभासद पुण्याकडे निघाले.

या स्वारीची वार्ता साऱ्या वर्तमानपत्रांत झळकली, आणि साऱ्या पुण्यांत धांदल आणि गडबड उडाली. लतिका आणि 'जटादण्ड–मण्डळ'

याखेरीज तिसरा विषय लोकांच्या बोलण्यांत उरला नाहीं. 'जटादण्ड-मण्डळा' चा तळ ओंकारेश्वराच्या देवळांत पडला होता, तिकडे लोकांच्या झुंडीच्या झुंडी येरझाऱ्या घालूं लागल्या.

* * * *

पुण्यास आल्याबरोबर पंचाननशास्त्र्यांनीं सामदामापैकीं पहिला उपाय करून पाहण्याचा आपला निश्चय जाहीर केला. 'जटादण्ड-मण्डळा' मार्फत गणपतराव गणपुले लतिकेची गांठ घेऊन नाटक-कम्पनींत शिरण्याच्या तिच्या निश्चयांतील अनौचित्य तिला पटवून देतील, तेव्हां तिनें वादास तयार राहावें, अशी रीतसर सरळ लेखी नोटीस 'जटादण्ड-मण्डळा' कडून तिला पाठविण्यांत आली. यावर लतिकेनेंही लेखी उत्तर पाठवून मण्डळाला कळवलें कीं, ठीक आहे. मी वादाला तयार आहें. खालीं दिलेल्या पत्त्यावर रात्रीं नऊ वाजतां मी 'जटादण्ड-मण्डळा' च्या कार्यवाहकांची वाट पाहीन. मात्र या वादाच्या वेळीं तिसरी कोणीही व्यक्ति हजर असतां कामा नये, व वाद अत्यंत गुप्तपणें व्हावा.

हें ठरल्यावर गणू गणपुले लतिकेनें दिलेल्या पत्त्यावर तिनें नेमलेल्या वेळीं जाऊन हजर झाला.

त्यानें वादाची तयारी तर खूप केली होती. अगदीं नवा कोरा पितांबर नेसून त्यानें त्याचा घट्ट काचा मारला होता. पायांत खडावा घातल्या होत्या. कपाळावर, दण्डावर आणि छातीवर त्यानें भस्माचे पट्टे ओढले होते. अकरा रुद्राक्षमाळा घातल्या होत्या. आणि दाढीजटांचे खोटे टोप त्यानें चापूनचोपून बेमालूम बसविले होते.

त्याचें मन मात्र वादासाठीं पाठ केलेल्या शास्त्रवचनांऐवजीं लतिकेचा विचार करण्यांत गुंतलें होतें. आपल्या मनाच्या या चाळ्याची त्याला भीति वाटत होती; पण तो चाळा त्याला कांहीं केल्या थांबवितां येईना. त्यानें लतिकेचा बापसुद्धां कधीं पाहिला नव्हता. मग लतिकेची गोष्ट तर दूरच. त्यामुळें ती सुंदर असेल का कुरूप असेल, उंच असेल कीं ठेंगणी असेल, बोलतांना हंसत असेल कीं क्रोधाविष्ट दिसत असेल, अशा अनेक गोष्टींचे अनेक तर्क गणूचें मन सारखें करूं लागलें.

तो जेव्हां लतिकेच्या दिवाणखान्यांत जाऊन पोंचला, आणि हंसत हंसत नमस्कार करणारी लतिका त्याला प्रत्यक्ष दिसली, तेव्हां त्याच्या मनाचे हे तर्क थांबले; पण, त्या क्षणापासून त्याचें मन दुसऱ्याच एका विस्मयानें व्यग्र झालें.

त्याला आधीं हें कळेना कीं, या खाजगी एकांतवादाच्या स्थळीं इतका झगझगीत विद्युत्प्रकाश कशाला होता ! स्टेजवर देखील इतका प्रकाश पाडलेला त्याच्या पाहण्यांत कधीं आलेला नव्हता !

तसेंच लतिकेकडे पहिली दृष्टि टाकतांच, ही कुलीन घराण्यांतली, नवमतवादानें बहललेली कां होईना पण कुलीन मुलगी आहे, यावर त्याचा कांहीं केल्या विश्वास बसेना !

ती पुरी उंचनिंच होती. या प्रकाशांत तिच्या अंगाची कांति चकाकत होती, तिची मुद्रा एखाद्या चित्रासारखी दिसत होती, अरुंद जरीकिनारीचें काळेंभोर पातळ तिला मोठें शोभत होतें, आणि तिनें आपल्या केंसांची रचना अशा कांहीं कौशल्यानें केली होती कीं, तिचा तो एकंदर थाट पाहतांच गणूनें चोरून वाचलेल्या नवमतवादी कादंबरींतल्या कारवारी नायकिणीची त्याला झटकन् आठवण झाली. तिचें तें डोळे फिरविणें, मान हालविणें, हंसणें, आणि पाय लचकल्यासारखें करून उभें राहणें—या साऱ्या गोष्टींनीं 'ही लतिका का एकादी नायकीण ?' असा भ्रम त्याच्या मनांत उत्पन्न झाला.

त्याच्या सर्वांगावर एकदम रोमांच उभे राहिले.

असले रोमांच त्यानें पूर्वी कधींच अनुभविले नव्हते !

त्या रोमांचांची त्याला भीति वाटली खरी, व मनांतल्या मनांत, 'गणपतराव, हुशार !' असें तो म्हणाला खरा; पण, ते रोमांच अंगावरून नाहींसे व्हावेत असेंहि त्याला वाटेना !

वादाला प्रारंभ कसा करावा हेंहि त्याला समजेना.

लतिकेनें त्याला विचारलें,

'चहा घेणार का ?'

त्यानें घुटका गिळला व कसेंबसें म्हटलें,

'छेः!'

'मग सोडा घेतां का?'

त्यानें दुसरा कोरडा घुटका गिळला, व आपला आवाज उमटणार नाहीं अशा भयानें नुसती नकारार्थी मान हालविली.

लतिकेनें त्याच्याकडे रोंखून पाहिलें, व हंसत म्हटलें,

'साधं पाणी तरी घ्या.'

गणूला नाहीं म्हणावयाचें होतें, पण त्याच्या घशाला विलक्षण कोरड पडली होती. त्यामुळें त्याला नकळत त्याची मान रुकारार्थी हालली.

लतिका हंसली, व 'आत्तां मला किती बरं वाटलं!' असें म्हणून एखाद्या चित्रपटांतल्या नायिकेप्रमाणें मुरडत मुरडत आंतल्या बाजूस चमत्कारिक आकाराचीं चांदीचीं दोन मोठालीं फुलपात्रें पाण्यानें भरून ठेवलीं होतीं तीं घेऊन आली.

पाणी प्यायल्यावर तो म्हणाला,

'ठीक आहे. आतां वादाला प्रारंभ करूं. लतिकाबाई, आपली आर्यसंस्कृति, आपल्या वेदशास्त्रसंपन्न घराण्याचा लौकिक, अन् आपलं स्वतःचं शील—या सगळ्याला काळिमा लावणारं जें कृत्य करायचं तुम्हीं योजलं आहे त्यापासून तुम्हांला परावृत्त करण्यासाठीं...'

येवढं तो बोलतो तोंच लतिका मोठमोठ्यानें हंसूं लागली.

तिनें असें कां हंसावें तें गणूला कळेना, आणि तिचें हंसणें लवकर थांबेल असेंहि लक्षण दिसेना.

शेवटीं त्यानें विचारलें,

'हें काय? तुम्ही अशा हंसतां काय?'

'सांगतें, सांगतें' असें लतिका म्हणाली, पण तितक्यांत तिला हंसण्याची आणखी एक मोठी उकळी आली. तिनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकण्याचा प्रयत्न केला तरी तें हंसणें कांहीं आवरलें गेलें नाहीं, आणि अखेर जेव्हां तिचा स्वतःचा तोलसुद्धां तिला संभाळवेना, तेव्हां गणू

बसला होता त्याच कोंचावर तिनें एकदम बैठक मारली.

गणपतराव गणपुले अंगावर वीज पडल्याप्रमाणें चमकले. लतिकेचें अंग त्यांच्या अंगाला घांसलें गेल्यामुळें हजारों विद्युल्लहरी आपल्या अंगांतून सर्वदिशीं निघून गेल्या असें त्यांना वाटलें. कोंचावरून उठून दूर होण्यासाठीं त्यांनीं हालचाल केली, पण तितक्यांत लतिकेनें त्यांना दोन्ही हातांनीं घट्ट धरलें व म्हटलें,

‘ हें काय ? असं दूरदूर काय जातां ? मी कां हंसलें तें सांगूं ना ? ’

यावर कोंचावरून उठण्याचा प्रयत्न करणें आपल्याला अशक्य आहे असें गणूला आढळून आलें. येशू ख्रिस्ताला खिळ्यांनीं क्रूसावर ठोकून बसवला होता तसें आपल्याला कोंचावर बसविलें आहे, असा त्याला भास झाला. फरक एवढाच कीं आपल्या अंगांत शिरलेले खिळे बोचण्याऐवजीं जरा आणखी बोचतील तर बरें होईल असें त्याला वाटत होतें.

बराच वेळ झाला तरी लतिका कांहीं बोलेना आणि गणूचे हातहि सोडीना. तेव्हां तो जराशा कठोर आवाजानें म्हणाला,

‘ हें काय ? सांगतां कीं नाहीं तुम्ही लवकर ? आणि सोडतां कां नाहीं माझे हात ? ’

यावर लतिका मान वेळावून म्हणाली,

‘ अय्या ! एक माणूस फारच रागावलं हो ! ’

आणि ती पुन्हां हंसूं लागली.

गणू चिडून म्हणाला,

‘ हें पहा, हें हंसणें तरी बंद करा, नाहीं तर वादांत हरलांत असं अजिंक्यपत्र तरी लिहून द्या. म्हणजे मी जातों. ’

हें बोलतांना गणूनें रागाचा फारच मोठा आवेश आणला. आपल्या कपाळाच्या शिरा ताडताड उडत आहेत असें त्याला वाटलें, आणि कोंचावरून उठून जाण्याऐवजीं डोळे मिटून तेथेंच गप्प पडावें असा थकवा त्याला एकदम वाटला.

त्याच्या मनांत एकदम शंका आली, आपण मद्यांशीं प्यालों तें पाणीच !—

पाणीच तर ! त्याला गुलाबपाण्यासारखा कसा छान वास आला होता. मद्य कितीहि सुवासिक झालें तरी त्याचा उग्र दर्प झांकत नाहीं असें त्यानें ज्ञानकोशाच्या ' म–र ' विभागांत वाचलें होतें–मग आपल्याला हा विलक्षण थकवा–

छेः ! त्या थकव्याचा सुद्धां त्याला विचार करवेना.

त्यानें लतिकेकडे पाहिलें व बरळल्यासारखें म्हटलें,

' आटप, वादाला प्रारंभ कर !...'

लतिकेनें त्याचा कान आपल्या तोंडाला लावून म्हटलें,

' किती वेडे हो तुम्ही ! स्त्रियांशीं एकांतांत वाद का करीत असतात पुरुष ?......'

तिचा सुगंधी उच्छ्वास गणूच्या मेंदूंत जाऊन भिनला. आपण एखाद्या पिसासारखे हलके झालों आहोंत, आणि कुणाच्या तरी फुंकरा-सारखे उंच उडवले जाऊन अन्तराळांत तरंगत आहोंत, असा त्याला भास झाला.

तो स्वतःशींच पुटपुटला,

' खरंच, एकांतांत स्त्रियांशीं वाद का करीत असतात ? '

एवढें पुटपुटून तो मोठमोठ्यानं हसूं लागला.

लतिकाहि मोठ्यानें हसूं लागली असें त्याला वाटलें आणि मग एक-दम त्याची सारी शुद्ध नाहींशी झाली.

* * * *

पांचसहा दिवस झाले तरी लतिकेच्या आणि गणपतराव गणपुल्यांच्या वादाचा कांहीं अंत होईना. पंचाननशास्त्र्यांना गणू रोज येवढेंच सांगे,

' अहो, मी तरी काय करूं ? लतिका रोज नवेनवे मुद्दे काढते आहे. गार्गी, मैत्रेयी या ऋषिकाळांतल्या स्त्रिया होत्या, तेव्हां त्यांच्यापेक्षां लतिका अधिक मोठी विदुषी आहे असं म्हणायचं नाहीं म्हणून. पण शास्त्रीबुवा, तुम्ही निश्चिंत असा. तिचे मुद्दे संपत आले आहेत आतां. आज भूगर्भ-शास्त्रांतला एक सिद्धांत टाकणार आहे तिच्यापुढं. त्याखालीं तिचे सारे

मुद्दे चिरडून गेलेच पाहिजेत. आज आटपतों काम; बघा तरी.'

गणू असें आवेशानें म्हणाला खरा, पण आधींच मनांतल्या मनांत संशयित झालेल्या पंचानशास्त्र्यांना त्याचा तो आवेश खरा वाटला नाहीं. गणूसारख्या विद्वानापुढं लतिकेची मात्रा सहा दिवस चालावी हें त्यांना विश्वसनीय वाटेना. त्याच्या बुडाशीं कांहींतरी घोंटाळा असावा असें त्यांचें मन आज दोनचार दिवस त्यांना सांगत होतें.

अखेर आज गणूच्या मागोमाग लतिकेच्या घरीं जाऊन कोठेंतरी लपून बसून त्याचा लतिकेशीं होणारा वाद चोरून ऐकण्याचें त्यांनीं ठरविलें.

आणि त्याप्रमाणें त्यांना करतांहि आलें.

ते ज्या खोलींत लपून बसले तेथून त्यांना दिवाणखान्यांतलीं बोलणीं तर ऐकूं येण्यासारखीं होतीच, पण शिवाय दाराच्या फळीला असलेल्या फटींतून गणू व लतिका यांच्या हालचालीहि दिसण्यासारख्या होत्या.

पंचाननशास्त्र्यांनीं पाहिलें तों गणूनें आधीं पाण्याचीं दोनतीन फुलपात्रें रिकामीं केलीं.

त्यांना वाटलें, मोठ्या कडाक्याच्या वादाची तयारी गणूनें चालवली असावी. लांग चढवणाऱ्या मल्लाकडे पाहून म्हणतात त्याप्रमाणें ते मनांतल्या मनांत म्हणाले,

'शाबास पट्ठे!'

आतां वाद सुरू होणार या अपेक्षेनें शास्त्रीबुवांनीं आपले कान शक्य तितके टवकारले.

पण त्यांना कांहींहि ऐकूं येईना.

गणू आणि लतिका एकमेकांच्या तोंडाजवळ तोंड नेऊन कुजबुजत होतीं!

वादाची ही तऱ्हा शास्त्रीबुवांनीं कधींच पाहिली नव्हती!

आणि कांहीं वेळानें तर त्या दोघाचें तें कुजबुजणें फारच हलक्या स्वरांत होऊं लागलें, आणि फटींतून जें दृश्य शास्त्रीबुवांना दिसलें त्यावर तर त्यांच्या दृष्टीचा विश्वासच बसेना.

मनाची खात्री करून घेण्यासाठीं जें दिसत होतें तें अधिक स्पष्ट दिसावें म्हणून दाराची फट नखांनीं ओरखडून मोठी करण्याचा शास्त्री-बुवांनीं प्रयत्न केला. पण, शास्त्रीबुवांचीं नखें म्हणजे कांहीं नृसिंहावताराचीं नखें नव्हतीं, किंवा दाराची ती फट म्हणजे कांही हिरण्यकश्यपूचें पोट नव्हतें! शास्त्रीबुवांच्या बोटाला रक्त मात्र आलें.

त्या वेदनेनें ते चिडले, आणि मग जें दिसलें तें काय कमी असंदिग्ध आहे अशा वैतागानें त्यांनीं जवळचा दंड उचलून दारावर जोरजोरानें आपटला, व ओरडून म्हटलें,

‘ गण्या, दार उघड ! ’

शास्त्रीबुवांचा तो पंचाननी आवाज ऐकतांच लतिकेनें मोठी किंकाळी फोडली, आणि ती धाड्दिशीं गणूच्या बाहुपाशांत पडली !

बिचाऱ्या गणूला तिकडे आड, इकडे विहीर असं झालं !

पण शास्त्रीबुवांच्या आरोळ्या आणि त्यांचे दारावरचे तडाखे थांबत नाहींत असें पाहून अखेर लतिकेला दूर करून तो उठला. त्यानें आपला दंड उचलला, आणि छातीठोकपणानें पुढें जाऊन दार उघडलें.

दिवाणखान्यांत प्रवेश करून पंचाननशास्त्री गर्जले,

‘ हा चांडाळा गण्या ! शेवटीं मंडळाचा असा घात केलास काय ? चल, हो मरणाला तयार ! ’

असें ओरडून त्यांनीं हातांतला दंड खरोखरच उंच केला.

पण, यत्किंचितहि न भितां गणू ओरडून म्हणाला,

‘ हा नतद्रष्टा पंचानन्या ! माझा असा ऐनवेळीं घात केलास काय ? चल, हो मरणाला तयार ! ’

असें ओरडतांना त्यानें आपल्या हातांतला दंड शास्त्रीबुवांच्या दुप्पट उंच करून हवेंत फिरवला.

दुसऱ्या क्षणीं दोघांनींहि एकमेकांवर प्रहार केले—

आणि तिसऱ्याच क्षणीं दोघेहि जमिनिवर निश्चेष्ट पडले !

लतिकेनं पुन्हां किंकाळी फोडली आणि ती ओरडली,

' लतिके, लतिके—अग, लवकर बाहेर ये ! हें सबंध 'जटादंण्ड—मंडळ' जखमी होऊन दिवाणखान्यांत पडलं आहे ग ! लतिके, धांव धांव ! कुणी-तरी धांवा हो !—'

तें ओरडणें ऐकतांच कोठूनसे दोनतीन लोक धांवत आले, आणि त्यांच्या मागोमाग एक वीसबावीस वर्षांची साध्याच वेषभूषेंत सुंदर दिस-णारी तरुण मुलगी धावून आली.

तेवढ्यांत गणूची आणि पंचाननशास्त्र्यांची मूर्च्छा संपली होती. त्यांनीं डोळे किलकिले करून सभोंवतीं पाहिलें.

नवीन आलेली मुलगी आतांपर्यंत जी ' लतिका ' होती तिची पाठ थोपटून म्हणत होती,

' शाबास ! मेनके, तूं माझी भूमिका तर उत्कृष्ट वठवलीस ! या गणपतरावांना वादांत जिंकायचं काम माझ्याच्यानं इतक्या सफाईनं झालं नसतं ! हें घे तुझं बक्षीस. '

असें म्हणून खऱ्या लतिकेनें खोट्या लतिकेच्या हातांत नोटा दिल्या.

पंचाननशास्त्री गणूला हलकेंच म्हणाले.

' हात् बेट्या गण्या ! बळी पडलास तोसुद्धां खऱ्या लतिकेला नाहीं, एका गणिकेला ! बरं, उष्टं खाल्लंस तर साजूक तरी खायचं होतंस ! '

गणू मूर्छेचें सोंग करून पुन्हां डोळे मिटायच्या बेतांत होता. पण तितक्यांत खरी लतिका त्याच्याजवळ आली व कांहीं नोटा पुढें करून म्हणाली,

' हा घ्या आपला पगार. '

' पगार ? '

आश्चर्यासरसें ताडकन् उठून गणूनें विचारलें.

लतिका म्हणाली,

' तुम्हांला आश्चर्य वाटणं साहजिक आहे. पण त्याचं असं झालं, ही माझी मैत्रीण मेनका एका चित्रपट कंपनींत नोकर आहे. त्या कंपनीला ' आधुनिक विश्वामित्र—मेनका ' या नांवाचा एक छोटा दोन रीलसचा

चित्रपट काढायचा होता. तुम्ही माझ्या भेटीला येणार हें कळल्यावर मला एक कल्पना सुचली. माझ्याऐवजीं या मेनकेनं तुमच्याशीं काय करायचं तें करावं असं मीं ठरवलं. तुम्ही आयतेच सुसज्ज विश्वामित्र आम्हांला मिळणार होतांत. तेव्हां मेनकेच्या या दिवाणखान्यांत लाइटिंग-ची व्यवस्था केली, आणखी या दोन कॅमेरेवाल्यांना त्या समोरच्या खोलींत बसवून फिल्म घेतां येईल अशी व्यवस्था केली. तुम्हीं जें उत्तम काम केलंत आधुनिक थाटाच्या विश्वामित्राचं, त्याबद्दल कंपनीनं ही फूल नाहीं फुलाची पाकळी तुम्हांला देऊं केली आहे. फिल्म फार सुंदर आली आहे, नाहीं का हो ? '

ते दोघे कॅमेरेवाले एकदम म्हणाले,

' अगदीं ओ. के. '

तें ऐकतांच गणू पुन्हां एकदम निश्चेष्ट पडला !

आणि पंचाननशास्त्र्यांनींहि सुविचार करून आपली जीर्णमतवादी दृष्टि कायमची झांकून घेतली !

---

# बेबी !  :  :  ५

लेकीनें 'ओ' दिली नाहीं म्हणून ताराबाईनीं खोलीच्या दारापासून मागें वळून दिवाणखान्यांत वर्तमानपत्र वाचीत बसलेल्या आपल्या लेका-कडे पाहिलें, आणि विचारलें,

' काय रे बाबूराव, ही कुठं बाहेर गेली आहे कीं काय ! '

वर्तमानपत्रांतून तोंड वर न करतां बाबूराव म्हणाला,

' मला तर कांहीं दिसली नाहीं बाहेर जातांना. '

' म्हणजे काय ! आंत असून ओ देत नाहीं ! बेबी !–ए बेबीऽऽऽअ !'

तरी आंतून 'ओ' आली नाहीं.

तेव्हां ताराबाईनीं खोलीचें दार आंत ढकललें आणि 'बेबी' अशी हांक मारतां मारतां खोलींत डोकावून पाहिलें.

त्यांची लेक आपल्या टेबलाच्या खणांतल्या वस्तूंशीं चाळवाचाळव करीत खुर्चीवर बसली होती.

तें पाहून ताराबाई म्हणाल्या,

' ही ग काय तऱ्हा तुझी ? किती हांका मारल्या, ऐकूं नाहीं आल्या तुला ! '

एक कागद खणांत झटकन् टाकीत त्यांची लेक म्हणाली,

' नाहीं आई ! खरंच मला हांका मारल्यास ? '

' नाहीं तर ? बेबी—बेबी, म्हणून ओरडत होतें सारखी ! '

' म्हणूनच मीं ओ दिली नाहीं. मला बेबी म्हणत जाऊं नका म्हणून तुम्हां सगळ्यांना कितीदां तरी सांगितलं आहे. चांगलं मालती असं नांव ठेवलं आहांत माझं, अन् बेबी—बेबी काय ? मी आतां लहान आहे का ग आई ? '

' इश्श ! म्हणजे तूं स्वतःला अगदीं पोक्त आजीबाई समजायला लागलीस कीं काय ? '

' अस्सं ! म्हणजे तान्हं बाळ आणखी आजीबाई अशा बायकांच्या दोनच अवस्था असतात, असं तुझं म्हणणं वाटतं ? '

' अग तसं नाहीं, पण—'

' पण काय ? आई, तुला खरंच सांगतें, तुम्ही सगळीं मला अगदीं कुकुलं बाळ समजतां तें मला नाहीं गडे आवडत ! मी आतां मोठी नाहीं का झालें ? बरंवाईट मला समजायला नाहीं का लागलं ? स्वतंत्रपणानं कांहीं करावं—सवरावं इतकं मला कळूं नाहीं का लागलं ? '

' लहान मुलांना नेहमींच वाटत असतं आपल्याला पुष्कळ कळायला लागलं आहे म्हणून. पण बेबी—'

मालतीनें आपल्या दोन्ही कानांत बोटें घातलीं आणि रागानें म्हटलं,

' बघ आई, पुन्हां बेबी म्हटलंस तें—'

' बरं बाई, मालती म्हणतें. '

कानांतलीं बोटें काढून मालती म्हणाली,

' मग ऐकेन. काय सांगत होतीस ? '

' अग, सांगायचं होतं काय मोठंसं ! मी येवढंच म्हणत होतें, कीं मुलींना कितीहि वाटलं आपण मोठ्या झालों म्हणून, तरी मोठ्या माणसांना प्रेमामुळं त्या लहानच वाटतात. '

‘ हेंच, हेंच माझं म्हणणं. माझी तक्रार आहे ती हीच आहे. तुम्हीं मोठ्या माणसांनीं आमच्यावर प्रेम जरा कमी केलंत तर बरं होईल ! पक्षीसुद्धां आपल्या पिलांना कायमचींच नाहीं कांहीं आपल्या पंखाखालीं धरून ठेवीत. ’

ताराबाईनीं क्षणभर लेकीकडे निरखून पाहिलें व म्हटलें,

‘ उद्यां लग्न होऊन दोन मुलं झालीं म्हणजे मग तुला कळेल माझं म्हणणं. ’

मालतीला आपल्या लग्नाचा विषय निघायला नको होता असें दिसलें. ती झटकन् म्हणाली,

‘ बरं, तें जाऊं दे, कां हांक मारीत होतीस मला, तें सांग ? ’

‘ तूं मला त्यांना विचारायला सांगितलं होतंस ना, मुंबईस मेडिकल कॉलेजांत जायची तुझी इच्छा आहे त्याबद्दल ?—

‘ हो हो. विचारलंस का भाऊंना ? त्या कॉलेजांत दाखल व्हायची तारीख आतां अगदीं जवळ आली आहे. एकदोन दिवसांतच काय तें ठरवलं पाहिजे. विचारलंस का ? ’

‘ हो. ’

‘ मग काय म्हणाले भाऊ ? ’

‘ ते म्हणाले, मेडिकल कॉलेजांत जायचा बेत कांहीं वाईट नाहीं. अजून डॉक्टरणींची फारशी गर्दी झालेली नाहीं. बायका डॉक्टरणी झाल्या तर हव्याच आहेत. पण—’

‘ पण काय ? पैसे फार लागतील म्हणाले ? ’

‘ नाहीं; तसं कसं म्हणतील ? तुझ्यासाठीं ते पैशांकडे पाहातील का बरं ? ’

‘ मग ? चारपांच वर्षांचा कोर्स मला झेंपणार नाहीं असं का भाऊंना वाटतं ? ’

‘ नाहीं; तसंहि नाहीं. ’

‘ मग काय ? ’

' त्यांचं म्हणणं असं—मुम्बईत आपल्या नात्यागोत्याचं किंवा ओळखीचं असं एकहि माणूस नाहीं, कीं ज्यांच्या घरीं तुला ठेवतां येईल. तुला त्या कॉलेजांत धाडायची म्हणजे कुठंतरी बोर्डिंगांतच ठेवायला पाहिजे. '

' हो; मी राहायला तयार आहे. '

' पण तेंच तर त्यांना नको आहे. '

' तें कां बाई ! '

' त्यांचं म्हणणं, येवढयाशा मुलीला अशा कोंवळ्या वयांत—'

मालतीनें आईला पुढें बोलूंच दिलें नाहीं. ती रागानें म्हणाली,

' समजलं, समजलं आई ! पांगुळगाडा धरून चालणारी दोन वर्षांची मुलगी मी आहे ही तुमची समजूत सोडायला कांहीं तुम्ही तयार नाहीं. मला कुठं जाऊं देऊं नका, कांहीं करूं देऊं नका ! माझं लोणचं घालून ठेवा एका कांचेच्या बरणींत ! '

इतकें म्हणून मालतीनें टेबलाचा खण खसदिशीं बंद केला आणि खुर्चीवर बसून दोन्ही हातांचीं कोंपरें टेबलावर टेकून आपल्या दोन्ही तळव्यांनीं तोंड झांकून घेतलें.

ताराबाई कांहीं वेळ लेकीकडे पाहात राहिल्या. त्यांच्या यजमानांनीं जो विचार केला होता तो त्यांना वाजवी वाटत होता, पण त्यामुळें लेकीला दुःख झालेलें पाहून त्यांच्या मनाला मोठ्या यातना झाल्या. उलट तिनें आपल्या मनाला इतकें वाईट वाटून कां घ्यावें तेंहि त्यांना कळेना.

त्या कांहीं वेळ तेथें उभ्या राहिल्या, आणि लेकीशीं या वेळीं अधिक बोलण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून तेथून निघून गेल्या.

थोड्या वेळानें मालतीनें मस्तक उचलून वर केलें, टेबलावरचे हात उचलून आपले डोळे पुसले आणि एक दीर्घ निःश्वास टाकून मघाशीं बंद केलेला टेबलाचा खण उघडला.

जणुं तिच्या हृदयव्यथेवरील एखादें औषधच ती बांहेर काढीत होती, अशी त्या वेळीं तिची मुद्रा दिसत होती.

तिनें खणांतून तीन पत्रें बाहेर काढलीं; त्यांकडे बराच. वेळ पाहिलें व मग त्यांतील जें सर्वांत लहान होतें तें उघडून ती वाचूं लागली–

' प्रिय मालतीबाई

तुमचा माझा परिचय झाल्यानंतर थोडयाच दिवसांत मला मुम्बईस परत यावं लागलं याबद्दल मला वाईट वाटतं. माझा मित्र रघुनाथ याच्या मध्यस्तीनं तुमची ओळख झाल्यापासून आपण दोनचारदांच एकत्र आलों व बोललों–चाललों. पण तेवढयांत तुमच्या बुद्धीची तीव्रता, आणखी जिज्ञासा माझ्या पुष्कळच प्रत्ययास आली. तुमचीं कांहीं कांहीं मतं मला मोठीं मनोरंजक वाटलीं. तुमच्याशीं अधिक दाट परिचय होऊन तुमचीं आणखी मतं समजावून घेतां येतील अशी मीं मनाशीं मोठी आशा ठेवली होती. पण...मुम्बईस येणं मला भाग पडलं.

' वेस्टर मार्क ' चं जें पुस्तक तुम्हांला वाचायला देईन म्हटलं होतं, तें या पत्राबरोबरच रघुनाथ तुमच्याजवळ देईल.

तें परत करण्याची घाई नाहीं.

या पत्राचं उत्तर मात्र लवकर घातलंत तर हवं आहे. माझा पत्ता तुम्हांला आठवत असेलच. आठवत नसला तर तुमच्या दृष्टीनं पत्र धाडा-यच्या योग्यतेचा मी नाहीं असंच मी समजेन, आणखी जास्ती तसदी पुन्हा देणार नाहीं.'

हें पत्र मालतीनें कितव्यांदा तरी वाचलें, व तें लिहिणाऱ्या शरच्चंद्रा-विषयींच्या आपल्या भावनेचें कितव्यांदा पृथक्करण तिनें करून पाहिलें तें तिचें तिला माहीत ! '

शरच्चंद्राचा व तिचा प्रथम परिचय झाला तेव्हांपासून त्याच्या इतर गुणांपेक्षांहि, तिला मोठेपणा देऊन, तिच्या अंगीं निरनिराळ्या गोष्टीं-विषयीं स्वतंत्र मतें बनाविण्याची पात्रता आहे असें समजून, तो ज्या मधुर वृत्तीनें तिच्याशीं वागला होता, त्या वृत्तीचाच तिच्या अंतःकरणावर अधिक परिणाम झाला होता.

' मला असं वाटतं ' असें म्हणून त्यानें तिला क्वचितच कांहीं सांगि-

तलें होतें. 'तुम्हांला काय वाटतं?' असें म्हणून तो तिला नेहमीं बोलायला लावी. 'माझं मत असं आहे' असा शेवट करण्यासाठीं तो कधीं बोलल्याचें मालतीला आठवत नव्हतें. 'तुमचं मत काय आहे?' असें मात्र शरचंद्रानें तिला कितीदांतरी विचारलें होतें.

या त्याच्या वागण्याच्या तऱ्हेचें मालतीला मनस्वी आकर्षण वाटत गेलें होतें. घरीं तिची आई, तिचे वडील किंवा तिचा भाऊ कोणीच तिला परिपक्व बुद्धीची समजण्यास तयार नव्हतें. जो तो तिच्याशीं अशा भावनेनें वागे, कीं जणूं ती एक सुंदर कचकड्याची बाहुली होती, आणि तिला स्वतःच्या पायांवर उभें राहूं देण्यांत मोठा धोका होता! या बाहुलीपणाचा मालतीला वयपरत्वें कंटाळा आला होता. आपल्या अंगीं आलेल्या विचारशक्तीचा मोठेपणा हीं घरांतलीं आणि भोंवतालचीं माणसें कां कबूल करीत नाहींत तें न समजून ती हळूहळू चिडूं लागली होती, आणि आपल्या विचारशक्तीला मान्यता आणि उत्तेजन देणारी व्यक्ति आपल्याला आढळेल का, अशा अधीरतेनें ती जगांत वावरतांना इकडे तिकडे पहात होती.

अशा वेळीं तिला शरचंद्र भेटला. तिला तो आवडला. त्याच्या पहिल्या पत्राचें तिनें ताबडतोबच नव्हे, तर लांबलचक उत्तर पाठविलें.

अर्थात् तिनें शरच्चंद्राबद्दलच्या साऱ्या गोष्टी आपल्या घरच्या मंडळींपासून अगदीं गुप्त ठेवल्या. तो श्रीमंत नव्हता, पदवीधर नव्हता, इतकेंच नव्हे, तर राजकीय चळवळींत त्याचें प्रमुख अंग असल्यामुळें त्याच्या आयुष्यांत सुखाला आणि स्वास्थ्यालाहि फारशी जागा नव्हती. पण, असें असूनहि—कां कोणास ठाऊक असें होतें म्हणूनच?—तो आपल्याला कां आवडतो तें आपल्या आईबापांना व वडीलधाऱ्यांना कांहीं केल्या समजणार नाहीं, अशी तिला खात्री आणि भीति वाटत होती.

या साऱ्या गोष्टी मालतीच्या मनांत, तिनें शरचंद्राचें तें पहिलें पत्र वाचलें कीं येत, व त्याप्रमाणें आजहि पुन्हा एकदां आल्या.

तिनें त्या पत्राची घडी केली. दुसरें पत्र वाचण्यासाठीं हातीं घेतलें.

पण तितक्यांत तिचा भाऊ खोलींत आला, व म्हणाला,

‘ बेबी—‘

मालतीनें त्याच्याकडे वर पाहून भुंवयांना आंठी घातली, व म्हटलें,

‘ मी तुझ्याशीं बोलावं अशी तुझी इच्छा असेल तर मला नीट हांक मारायला शीक आधीं. ’

‘ नीट म्हणजे काय बुवा ! चांगलं बेबी म्हटलं, त्यांत काय चुकलं ? ’

‘ त्यांतच चुकलं ! तुला पूर्वी सगळींजणं बाबू म्हणत होतीं; पण आतां बाबूराव म्हणतात ! ’

‘ असं असं ! म्हणजे तूं मोठी झाली आहेस असं तुझं म्हणणं होय ? ’

‘ माझं म्हणणं नाहीं, खरी गोष्ट आहे ती. ’

तें ऐकतांच बाबूराव मोठ्यानें हंसला, व म्हणाला,

‘ अग, पण आपल्या भाऊंना कुठं मान्य आहे तें ? तेच तर तुला सांगायला आलों होतों. आज ‘ मेरी बुड्डो ’ हा चित्रपट आपण पाह्यला जाऊं, असं तूं म्हणाली होतीस ना ? म्हणून मी आतां भाऊंना त्याबद्दल विचारलं. तेव्हां ते मला म्हणाले, तूं जा वाटेल तर एकटा; बेबीला नेऊं नकोस. लहान मुलींनीं पाहाण्यालायक नाहीं तो चित्रपट. ’

तें ऐकतांच मालतीनें विचारलें.

‘त्यांना कसंरे कळलं लहान मुलींनीं पाहाण्याजोगा नाहीं तो चित्रपट तें ? ’

‘ वा ! ते गेले होते ना काल शेवटच्या ‘शो’ला. ’

यावर मालती स्वतःशींच काय पुटपुटली तें बाबूरावाला ऐकूं आलें नाहीं. तो अधिक वेळ तेथे उभा राहिला नाहीं.

मालतीनें त्या दिवशीं शरच्चंद्राला एक खूप मोठें पत्र लिहिलें. दोन दिवसांनीं शरच्चंद्राकडून उत्तर आल्यावर ती आपल्या वडिलांच्या खोलींत गेली व म्हणाली,

‘ मुंबईच्या मेडिकल कॉलेजांत दाखल होण्याचा अर्ज मी करूं का नको ?’

तिचे वडील कुणालाशीं नोटीस देण्याचा मजकूर कारकुनाला सांगत होते. तें काम तसेंच चालू ठेवून ते तिला म्हणाले,

६

'मला वाटतं तूं आपलं बी. ए. व्हावंस हें चांगलं.'

'पण भाऊ, मला त्या अभ्यासांत गोडी वाटत नाहीं.'

'अग, गोडीचा अन् अभ्यासाचा काय संबंध आहे?'

'वा! परवांच युनिव्हर्सिटीचे व्हॉइस चॅन्सेलर आमच्या कॉलेजांत आले होते. त्यांनीं आपल्या भाषणांत सांगितलं कीं, प्रत्येक विद्यार्थ्यानं आपलं ध्येय, आपली आवडनिवड नीट ठरवावी, अन् मग कोणता तो अभ्यास करावा.'

'अग, हे मोठे लोक टाळ्या मिळविण्यासाठीं वाटेल तें बोलतात. माझं ऐक, बी. ए. च हो तूं.'

'पण भाऊ, मला डॉक्टरीच्या धंद्याची आवड आहे फार.'

'अग, आवड काय, जो अभ्यास करावा त्याची आवड उत्पन्न होते आपोआप.'

'लग्नानंतर प्रेम आपोआप उत्पन्न होतं म्हणतात, त्यांतलंच दिसतं आहे तुमचं म्हणणं! तें कांहीं नाहीं. मला मेडिकल कॉलेजांत जायची फार इच्छा आहे.'

'अग, पण तें कॉलेज मुंबईंत आहे. तें इथं असतं तर गोष्ट निराळी होती.'

मालतीनें आज पक्कें धीटपणानें बोलावयाचें ठरविलें होतें, त्यामुळें ती म्हणाली,

'मुंबईंत मला काय कुणी खाऊन टाकील वाटलं?'

'अग, तसं नाहीं; पण—'

'पण काय?'

'तुला कळायचं नाहीं तें. बेबी, तूं लहान आहेस अजून.'

'बेबी! बेबी! तूं लहान आहेस! तूं लहान आहेस!...'

या शब्दांचा मालतीला आतां अगदीं तिटकारा आला होता.

त्या तिटकाऱ्याच्या भरांत ती आपल्या बापापुढून निघून चालती झाली.

तिला आपल्या वडिलांचे शेवटचे शब्द ऐकूं आले ते एवढे—

' अहो, अशी नोटीस द्यायला कांहींच हरकत नाहीं. अज्ञानाच्या पालकत्वाबद्दलचा कायदाच असा आहे...'

* * * *

दोन दिवसांनीं गांवभर बातमी पसरली कीं, भाऊसाहेबांची मालती घरांतून निघून गेली !

कोणी म्हणे, तिचें एका ख्रिस्ती विद्यार्थ्याबरोबर लवकरच लग्न होणार आहे; आणि एकदोघांनीं तर छातीला हात लावून सांगितलें, कीं मालती गांव सोडून कुठें गेलीच नाहीं, तिनें एका मुसलमानाशीं लग्न केलें आहे, आणि एका गुप्त स्थळीं या गांवांतच ती आहे !

रघुनाथाकडून आलेल्या पत्रावरून या बातम्या जेव्हां शरच्चंद्रास व मालतीस कळल्या तेव्हां तीं दोघेंहि मनःपूर्वक हंसलीं.

मालतीनें आपल्या आईस मुंबईहून पहिलें पत्र धाडलें, त्यांत तिनें लिहिलें.

' आई, साऱ्या गांवान मी घरांतनं पळून गेलें असं म्हटलं, तरी तूं किंवा भाऊंनीं तसं म्हटलं नाहीं म्हणजे मला आनंद आहे. तुम्ही विचार करा, ' पळून जाणं ' या शब्दांना जो वाईट अर्थ आहे, त्या अर्थानं कां मी इकडे आलें आहें ? तुम्हांला न सांगतां आलें येवढंच काय तें. पण तसं करायला मला कुणीं भाग पाडलं? तुम्हीच ना ? तुम्हांला वाटतं, मी अजून ' बेबी ' आहें, ' बाळ ' आहें. मला सिद्ध करायचं आहे, कीं मी बेबी नाहीं, स्वतःची काळजी घेऊन जगांत धडपणानं पाऊल टाकण्याइतकी मी आतां चांगली मोठी झालें आहें. मी इथें स्वतःची काय काय व्यवस्था केली आहे तें पुढच्या पत्रांत सविस्तर लिहीन ! आत्तां येवढंच सांगतें, कीं चिंता करूं नकोस !

आणखी—हो, मला पत्र लिहिशील त्यांत मला ' बेबी ' म्हणूं नकोस !

तुझी
मालती.'

---

## गुन्हा कीं सत्कृत्य ? : : ६

गिरसप्पाच्या धबधब्यावर दोनच दिवस राहून पुढें धारवाडला जाण्याचा आमचा मूळचा बेत होता. पण आश्विन महिन्याच्या त्या अखेरच्या दिवसांत गिरसप्प्यावरची चहूंबाजूंची सृष्टिशोभा ऐन बहरांत आलेली असल्यामुळें दोनच दिवस राहून तिथून हालणं आमच्या साऱ्यांच्या अगदीं जिवावर आलं; अन् शिवाय म्हैसूर सरकारच्या त्या सुंदर डाक बंगल्यांत आणखी चार दिवस राहण्याची आम्हीं तारेनं परवानगी मागितली तीहि मिळाली. मग आम्हीं वाढविला आपला मुक्काम. आमच्या या बदललेल्या बेतांत संमति द्यायला अनमान करणारे आमच्या कंपूंत एकच गृहस्थ होते. ते म्हणजे डॉक्टर जोशी. ते आमच्या म्हैसूरच्या सफरींत सामील झाले होते तेच मुळीं बरेचसे आढे-वेढे घेतल्यानन्तर, अन् काय वाटेल तें झालं तरी ती सफर पंधरा दिवसांत आटपायचीच असं आम्हीं कबूल केल्यानंतर. म्हैसूरच्या डाक बंगल्यांत आणखी चार दिवस राहायला मिळावं म्हणून आम्ही तार करूं

लागलों तेव्हां ते मला म्हणाले,

" अरे, कशाला करतां तार ? परवानगी मिळायची नाहींन् कांही नाहीं."

मीं म्हटलं, " नाहीं मिळाली तर चाललोंच कीं आपण. भिक्षुकाला काय. मिळाले मूठभर तांदूळ तरी वाहवा, नाहीं तरी वाहवा. पुढचं घर आहेच कीं. तार करून पाहायला आपलं काय जातं आहे ? "

" पण आपण तोंड वेंगाडायचं अन् त्यांनीं नाहीं म्हणायचं हे नाहीं बुवा आपल्याला आवडत ! "

" त्यांत आवडायचं काय अन् न आवडायचं काय डॉक्टर ? ओव्हर-बाउंडरी मारायसाठीं बॅट उचलायची. दमला तडाखा तर मग रन्स मिळतील, हुकला तर फार फार तें काय, दांडी उडेल ! त्याची कुणाला आहे पर्वा ? "

" हो, तें खरं. पण..." असं पुटपुटून डॉक्टर रेंगाळले, तेव्हां मीं म्हटलं,

" त्याचं असं आहे डॉक्टर, तार करूं नका असं तुम्ही म्हणतां त्याचं खरं कारण जरी तुम्हीं सांगितलं नाहींत तरी तें आम्हांला कळतं. "

" तें काय बुवा ? "

" प्रॅक्टिसचे पैसे बुडतात म्हणून तुम्हांला झाली आहे घाई परत जायची. पण खरंच सांगा डॉक्टर, अशा निसर्गरमणीय ठिकाणीं मजेनं मन मानेल तितके दिवस राहायच्या सुखाची मातब्बरी जास्त, कीं पैशाची मातब्बरी जास्त ? "

डॉक्टर किंचित् हसले अन् म्हणाले, " पैसे कमवणाऱ्या माणसाची साधेल तेव्हां चेष्टा कराण्याची तुम्हां लेखक लोकांना हौस असते खरी. पण डॉक्टरांचा जीव दवाखान्याकडे ओढ घेतो तो नेहमीं पैशासाठींच घेतो असं नाहीं. कर्तव्यबुद्धीचाही भाग थोडा असतो त्यांत. ज्या रोग्यांना आपली फार गरज आहे अशांना सोडून मजा मारीत दूर राहिलं म्हणजे मन खात असतं सारखं. अन् शिवाय या ठिकाणीं राहणं तुम्हांला सग-

ळ्यांना जितकं सुखाचं होतं आहे तितकं मला होऊं नये याला एक मोठं कारण आहे. त्याची कुणाला कल्पना असणं शक्य नाहीं; पण तें आहे खरं."

माझी जिज्ञासा एकदम जागृत होऊन मीं विचारलं, "असं! तें काय कारण? सांगा तरी."

"कां? गोष्टीला कांहीं कथानक सुचेनासं झालं आहे होय तुला?"

"नाहीं बुवा, तसं कांहीं नाहीं. पण जिथून क्षणभरसुद्धां हालूं नयेसं वाटावं असं हे ठिकाण अन् तुम्ही म्हणतां इथं राहण्यांत तुम्हांला सुख वाटूं नये असं एक कारण आहे. तेव्हा साहजिकच मला जिज्ञासा वाटली. सांगा!"

"अं-हं, आतां नको. मग सांगेन केव्हांतरी."

डॉक्टरांना मीं जास्त आग्रह केला नाहीं; पण माझ्या मनांत मात्र त्यांचं बोलणं राहिलं. गिरसप्पावरचा मुक्काम त्यांना सुखदायक कां वाटूं नये याबद्दल मी आपल्या मनाशीं नाना प्रकारचे तर्क करून पाहिले; पण त्यांपैकीं एकहि माझा मलाच पटेना. बाह्यात्कारीं पाहिलं तों डॉक्टर आमच्या हिंडण्याफिरण्यांत, खाण्यापिण्यांत. गप्पागोष्टींत व पत्त्यांच्या डावांत अगदीं मनःपूर्वक भाग घेत होते. त्यांच्या मनाला कुठली गोष्ट बोचत असावी याची मला कांहीं कल्पना होईना.

आमच्यापैकीं रंगोपंत शेंडे म्हणून जे एक गृहस्थ होते त्यांना दोन गोष्टींची फार हौस होती. एक दैनिक वृत्तपत्रांतील अगदीं ओळन्ओळ वाचून काढायची, अन् दुसरी, वृत्तपत्रांत वाचलेल्या एखाद्या बातमीच्या निमित्तानं तात्त्विक वाद उत्पन्न करून खडाजंगी चर्चा करायची. आम्हांला ते दुपारच्या जेवणानन्तरची झोपसुद्धां घेऊं देत नसत. त्यांची चाहूल लागली कीं, आम्ही एकमेकांना इषारा द्यायचा, "आलं रे बाबा शेंडे नक्षत्र. संभाळा." अन् मग आम्हीं सगळ्यांनीं झोपेंत घोरायला लागल्याचं नाटक करायचं. आमच्या या बतावणीला शेंड्यांची स्वारी दाद देईल अशी खात्री नसे आम्हांला; पण आपली बतावणी करून पाह्यची एवढंच.

पण त्या दिवशीं शेंडे नक्षत्र जें उगवलं तें मुळीं मोठ्यांदा ओरडतच— " अरे लेकांनो, निजलांत काय ? उठा. राजाभाऊ, अहो रावसाहेब, चिंत्या, अरे ही पाहिलीत का टाइम्समधली बातमी ? अन् डॉक्टर, तुम्ही तर आधीं वाचली पाहिजे. सुरतच्या एका डॉक्टरानं काय केलं बघा. उठा उठा सगळे. मी वाचून दाखवतों. चिंत्या, त्या गणपतीला ढोसून उठव रे ! लेकाचा लेखक म्हणवितो स्वतःला अन् जिज्ञासा पाहावी तर काडीची नाहीं ! ए आळशी गणोबा, ऊठ ऊठ, डोळ्याला पाणी लाव जरा अन् ऐक मी काय वाचतों तें. "

शेंडेमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे मी उठून बसलों. डोळ्याला पाणी लावलं अन् त्यांनीं टाइम्समधून जी बातमी वाचून दाखवायला सुरवात केली ती ऐकूं लागलों—

बातमी दहाबारा ओळींचीच होती. बिलिमोरिया नावाच्या सुरतेच्या एका डॉक्टरानं एका रोग्याला विष दिल्याचं उघडकीस आलं होतं. अन् आपल्या जबानींत त्यानं सांगितलं होतं, कीं कायद्याप्रमाणं मी गुन्हेगार ठरून मला शिक्षा व्हायची असली तर ती खुशाल होऊं दे; पण नैतिक दृष्ट्या माझा कांहीं एक अपराध नाहीं. कारण असह्य यातनांतून रोग्याची सुटका करावी अशा सद्हेतूनंच मीं त्याला विष दिलं...

केवळ ही बातमी वाचून दाखविल्यानं रंगोपंतांच्या जीवाचं समाधान होणं शक्य नव्हतं. बातमीची ठिणगी टाकून खडाजंगी वाद भडकवावा हाच त्यांचा नेहमीचा खरा उद्देश असे हें आम्हांला माहीत होतं. त्यामुळं बातमीचं वाचन संपतांच स्वारी जेव्हां ईर्षेनं म्हणाली, " काय गणू, तुला काय वाटतं रे ? यांत डॉक्टराचा केवढाहि सद्हेतु असला तरी कोर्टानं त्याला फाशीची शिक्षा ठणकावलीच पाहिजे असं नाहीं तुला वाटत ? "

तेव्हां मींहि मनांतल्या मनांत अस्तन्या वर सरकवून म्हटलं,

" मुळींच नाहीं वाटत. कोर्टाला कांहीं अक्कल असेल तर त्यानं या डॉक्टरला निर्दोषी ठरवून सोडून दिलं पाहिजे. "

मग काय विचारतां ! आमच्या मंडळींत लगेच दोन तट पडले अन्

हां हां म्हणतां वाद चांगलाच रंगला. एका पक्षाचं म्हणणं खून हा केव्हांहि खूनच. तो जरी एखाद्याच्या कल्याणासाठीं केलेला असला तरी त्याचा भयंकरपणा कांहीं कमी होत नाही. दुसऱ्या पक्षाचं म्हणणं असं, कीं खुनांतसुद्धा हेतूचा विचार अवश्य केला पाहिजे.

मधेंच माझ्या मनांत आलं, डॉक्टर जोश्यांचं मत काय पडतं तें पाहावं: पण ते बसले होते त्या जागेकडे वळून पाहातां तों ते उठून गेले होते: आमचा वाद संपला, सगळ्यांचा तोंडांना ओरडून कोरड पडली, म्हणून आचाऱ्याकडून आम्हीं चहा आणविला, तोंपर्यंत ते बैठकींत परत आलेच नाहींत.

संध्याकाळीं आम्ही फिरायला गेलों. माझा बूट मला फारच लागूं लागला म्हणून मी मधेंच एके जागीं बसलों. माझ्या संगतीला डॉक्टर बसले अन् बाकीची मंडळी पुढें गेली.

दुपारचा विषय माझ्या मनांत अजून होता म्हणून इकडच्यातिकडच्या गोष्टी चालू असतांना मीं मधेंच म्हटलं,

" डॉक्टर, दुपारच्या चर्चेच्या वेळेस तुम्ही एकदम उठून कां गेलांत ? तुमचं मत काय आहे तें मला कळायला हवं."

" कशाबद्दल ?"

" सुरतेच्या त्या डॉक्टर बिलिमोरियाच्या कृत्याबद्दल."

" त्याबद्दल मत द्यायला मी नालायक आहें."

" वा ! असं कसं म्हणता ? तुम्ही तर स्वत डॉक्टर आहांत. आपल्या मंडळांत त्या प्रश्नावर मत द्यायला सगळ्यात जर लायक कुणी असेल तर ते तुम्हीच."

" पण..." असं म्हणून ते थबकले.

" पण काय ?"

" माझ्या हातूनच तसा एखादा खून झाला असेल तर ?"

मीं एकदम दचकून विचारलं, " काय ? तुमच्या हातून ?"

" होय. माझ्या हातून. अन् तो दुसऱ्या कुठल्या ठिकाणीं नव्हे तर

इथंच, गिरसप्पावर. इथला मुक्काम तुम्हां सर्वांना होतो तितका अल सुखाचा न होण्याला एक कारण आहे असं मीं त्या दिवशीं तुला सांगितलेलं आठवतं ना ? तें कारण पुढं कधी तरी सांगेन असं मीं तुला म्हटलं होतं. हेंच तें कारण. या ठिकाणीं पूर्वी एकदां मीं खून केलेला आहे. आपण इथं आलों तेव्हांपासून त्या माझ्या कृत्याची मला सारखी आठवण येत आहे, अन् ती आली, कीं वाटत नको इथं राहाणं. ”

डॉक्टरांचं तें बोलणं ऐकून मी विस्मयानं स्तब्धच झालों. कांहीं वेळ माझ्या तोंडून शब्दच बाहेर पडला नाहीं. जरा वेळानं मी विचारलं,

“ त्या मरतेच्या डॉक्टरांप्रमाणेच तुम्हीं आपल्या पेशंटला विष दिलंत ! ”

“ अंहं. ”

“ मग ? ”

“ तुला सगळीच हकिगत सांगतों. फार वर्षं झालीं त्या गोष्टीला. मी नुकताच आठ वर्षं इंग्लंडमध्यें अभ्यास करून डॉक्टर होऊन परत आलों होतों. इंग्लंडमध्यें अभ्यास करीत असताना माझी अन् एका म्हैसुरी विद्यार्थ्याची बरीच ओळख झाली. त्याच्या आमंत्रणावरून म्हैसूरचा दसऱ्याचा उत्सव पाहायला मी इकडच्या भागांतली ट्रिप काढली. आपण या वेळीं जसे म्हैसूरहून गिरसप्पावर आलों, तसाच मीहि त्या वेळीं म्हैसूरहून परत निघालों, तो श्रवणबेळगोळ्याला एक दिवस, भद्रावतीच्या कारखान्यांत एक दिवस, असे मुक्काम करून इथं गिरसप्पाला आलों. मी आलों त्या दिवशीं म्हैसूरच्या बंगल्यांत दुसरा कोणीच प्रवासी नव्हता. मीं एकटा होतों. तो सबंध दिवस मीं मनसोक्त हिंडण्यांत घालविला. सध्यां आपल्याला दिसते तशीच आश्विनाच्या अखेरची रम्य सृष्टिशोभा जिकडेतिकडे पसरली होती. पावसाळा नुकताच उलगडला होता. सरकारी खात्याच्या लोकांनीं जंगलांतल्या वाटा नुकत्याच साफसूफ केल्या होत्या. वर्षाकालांत सतत न्हाऊन निघालेल्या झाडाझुडुपांना प्रखर सूर्यप्रकाशाचा नवीनच स्पर्श होऊन त्यांच्या शाखाशाखांवर विविध रंगांचीं सुंदर सुंदर

फुलं उमलायला लागलीं होतीं. ओलसर मातीचा वास अजूनहि रेंगाळत होता आणि चार महिने बंद झालेले पक्ष्यांचे आवाज डोंगरमाथ्यावर आणि खालच्या दरींत ऐकूं येऊं लागले होते. दिवसभर हिंडून मी अगदीं दमून गेलों होतों. पण रात्रीं जेव्हां टिपूर चांदणं पडलं, तेव्हां त्या चन्देरी प्रकाशांत धबधब्याची अवर्णनीय शोभा पाहात बसण्यापुढं मला झोपेची शुद्ध राहिली नाहीं. बंगल्याच्या व्हरांड्याच्या पायरीवर मी बसलों. समोरचा धबधबा दुधाच्या प्रचंड लोटासारखा दिसत होता अन् शेंकडों फुटांवरून खालीं उडी घेणाऱ्या त्या प्रपाताच्या धीरगंभीर आवाजानं माझ्या वृत्तीवर एक प्रकारची विलक्षण निर्विकार शांति चढल्यासारखी मला वाटत होती.

मी किती वेळ बसलों त्याचं मला भानच राहिलं नाहीं. डोळे उघडे ठेवून मनुष्य निद्रावश होणं शक्य असेल तर मला झोपच लागली होती असं म्हणायला हरकत नाहीं. शेवटीं कुणाची तरी चाहूल लागली तेव्हां मी माझ्या तंद्रींतून जागा झालों. मीं जरासं दचकून पाहिलं तों दोन माणसं माझ्यापुढं उभीं होतीं. त्यांतल्या एकाला मीं चटकन् ओळखलं. तो बंगल्याचा कामगार होता. तो मला म्हणाला,

'माफ करा, आपल्याला थोडी तसदी द्यावयाची आहे. आपण डॉक्टर आहांत, नाहीं ?'

'होय. का ? कुणाला सापबीप चावला आहे कीं काय ? किंवा कुणी आजारी—'

'होय, एक गृहस्थ फार आजारी आहेत. आपण लवकर चलायला पाहिजे. हा मनुष्य बोलवायला आला आहे.'

'कोण आजारी आहे ?'

'समोरच्या ब्रिटिश बंगल्यांत येऊन उतरलेले एक गृहस्थ एकाएकीं फार आजारी झाले आहेत, तिथल्या मंडळींना कळलं म्हैसूरच्या बंगल्यांत एक डॉक्टर येऊन उतरले आहेत. म्हणून त्यांनीं —'

माझ्या लक्षांत आलं. मी उठलों, कपडे घातले, औषधाची बॅग नीट तपासून बरोबर घेतली अन् मी त्या माणसांबरोबर निघालों.

नदीपर्यंत चालत जातांना मी त्या माणसाशीं कांहीं बोललों ना. आजपर्यंत जंगलांतून अपरात्रीं चालत मी कधींच गेलों नव्हतों. उंच आणि विस्तीर्ण झाडांच्या फटीफटींतून पडलेले चांदण्याचे लहानमोठे कवडसे खालीं जमिनीवर जिकडे तिकडे पसरलेले दिसत होते. दिवसां केव्हांच न आलेला असा गंध नाकांत शिरत होता. फक्त रात्रीच्या वेळींच आपल्या पोटांतला सुगंध बाहेर टाकणाऱ्या वनस्पती जंगलांत असतात कीं काय कोणास ठाऊक ? मागं मागं सरकणाऱ्या धबधब्याचा आवाज डाव्या अंगानं कानावर येत होता.

' काळी ' नदीच्या किनाऱ्यापाशीं आम्ही आलों तों आम्हांला नेण्यासाठीं नाव तयार होती. पलीकडच्या तीरावर ज्या गृहस्थांना पहायसाठी मी चाललों होतों त्यांची मोटार उभी होती. तिथून ब्रिटिश डाक बंगल्यांत पोंचायला आम्हांला पांचसात मिनिटंहि लागलीं नाहींत.

बंगल्याच्या व्हरांड्याच्या पायऱ्यांवर एक गृहस्थ उभा होता. तो त्या ठिकाणीं माझी वाट पाहात बराच वेळ उभा राहिला असला पाहिजे. मला पाहिल्याबरोबर एक मोठी काळजी दूर झाल्यासारखा श्वास सोडून तो म्हणाला,

' आम्हांला कळलं ते खरंच तर. आपण डॉक्टर आहात. आमचं भाग्य म्हणायचं. आपण अशा अवेळीं आलांत हे आपले आमच्यावर केवढे उपकार म्हणायचे ! '

' त्यांत कसले उपकार हो ! माझ्या येण्याचा कांहीं उपयोग झाला म्हणजे मला बरं वाटेल. '

शिष्टाचाराचं वायफळ बोलणं बोलण्यांत व्यर्थ कालक्षेप न करण्याबद्दल माझ्या त्या बोलण्यांतली सूचना त्याच्या लक्षांत आली असं दिसलं. बंगल्यांत शिरण्यासाठीं वळून तो मला म्हणाला, ' या. '

मी त्याच्या मागोमाग जाऊं लागलों. व्हरांड्यालगतचा हॉल व त्याच्या पलीकडच्या दोन खोल्या ओलांडून पश्चिम बाजूच्या अगदीं कडेच्या खोलींत आम्हीं प्रवेश केला.

उजव्या हाताच्या कोपऱ्यांतल्या पलंगावर कुणीतरी निजलेलं आहे

... मला वाटलं, म्हणून मी त्या बाजूलाच पुढें झालों. पलंगावर पडलेल्या व्यक्तीच्या अंगावर फार भारी किंमतीची शालजोडी होती. तोंडावरून पांघरूण घेतलं असल्यामुळं आजारी माणसाचा चेहरा मला दिसण्यासारखा नव्हता. परंतु एकंदर थाटावरून तो गृहस्थ फार श्रीमान् असला पाहिजे हें मीं केव्हाच ओळखलं होतं. पलंगाजवळ एक खुर्ची सरकवण्यांत आली. त्यावर मी बसलों. माझ्याबरोबर आलेल्या इसमानं आजारी माणसाच्या झांकलेल्या तोंडाशा तोंड नेल्यासारखं केलं अन् म्हटलं,

' डॉक्टर आले आहेत. पांघरूण दूर करणार का जरा ! '

त्याच्या स्वरांत नोकराला शोभणारी आदब होती तिचं मला नवल वाटल नाहा; पण त्यांत भीतीची जी सूक्ष्म छटा होती तिचं मला थोडं आश्चर्य वाटलं. जणूं डॉक्टर आणल्याची गोष्ट धन्याला पसंत पडेल कीं नाहीं आणि डॉक्टर आलेला पहातांच त्याचा त्रुस्सा होईल कीं काय अशा शंकेनें त्यानं ते शब्द उच्चारले. मला ते चमत्कारिक वाटले.

आणि तितक्यांत त्या गृहस्थानं ' अं... ' असं करून तोंडावरचं पांघरूण दूर केलं आणि त्याचा चेहरा मला नीट दिसला तेव्हां तर मला विस्मयाचा मोठाच धक्का बसला.

माझ्या मनांत आलं, काय हा चमत्कारिक योगायोग ! मनांतल्या मनांत मीं ज्या माणसाचा आज कित्येक वर्षं द्वेष अन् तिरस्कार केला, जो मेला तर फार बरं होईल असं अनेक वेळां मला वाटलं, त्याला औषधोपचार करण्यासाठीं मी या ठिकाणीं अकस्मात् यावं ही केवढी विलक्षण घटना म्हणायची !

त्या गृहस्थाची प्रकृति दुपारपासून एकाएकीं कशी बिघडली त्याची हकीगत त्याचा नोकर मला हलके हलके सांगूं लागला. पण माझं लक्ष त्याच्या बोलण्याकडे मुळींच नव्हत. माझ्या मनांत भूतकालांतल्या कितीतरी आठवणी एकदम उभ्या राहिल्या होत्या अन् पलंगावरच्या त्या दुखणेकऱ्याऐवजीं भूतकालांतले प्रसंग आणि व्यक्ति माझ्या दृष्टीपुढं तरंगत होत्या.

" मी आणि माधव कॉलेजच्या वसतिगृहांतल्या खोलींत एकत्र राहात होतों. गरीबींतून डोकं वर काढून स्वतःच्या कर्तबगारीनं आपल्या पायांवर उभा राहिलेला एक अत्यंत हुषार विद्यार्थी म्हणून माधवची ख्याति होती. माझ्या व त्याच्या आवडीनिवडी अगदीं भिन्न होत्या. त्याचा सारा वेळ अभ्यासांत जात असे. कॉलेजच्या तालीमखान्यांत जाऊन अर्धा तास मेहनत करण्यापलीकडे तो आपल्या पुस्तकांपासून दूर होत नसे. उलट माझा सारा वेळ क्रिकेट खेळण्यांत, इकडेतिकडे भटकण्यांत व कॉलेजांतच्या चळवळींत आणि दंगामस्तींत भाग घेण्यांत जात असे. परंतु असं असूनहि माझी त्याची दृढ मैत्री मात्र जमली होती. मी खोलींत असलों म्हणजे कधीकधीं मित्रत्वाच्या हक्कानं त्याच्या हातांतलीं पुस्तकं काढून घेई अन् त्याला म्हणे, ' जरा ठेव बाबा आतां तीं पुस्तकं दूर. घटकाभर गप्पा मारल्यास माझ्याशीं तर कांहीं नाहीं बिघडत ! ' आणि मग आमच्या पुष्कळ गप्पा होत असत. मी माझ्या साऱ्या हकीकती त्याला सांगे अन् तोहि आपल्या अडचणी आणि महत्त्वाकांक्षा अगदीं मोकळेपणानं बोलून दाखवी. हळूहळू आमच्या दोघांत इतका जिव्हाळा उत्पन्न झाला, कीं त्याच्यापासून मी कांहीं लपवून ठेवीत नव्हतों अन् तोहि माझ्यापासून कांहीं ठेवीत नसे.

त्यामुळं माधवच्या वागण्यांत किंचित् बदल झाला आहे असं जेव्हां मला वाटूं लागलं अन् माझ्यापासून तो कोणती तरी गोष्ट लपवून ठेवीत आहे अशी जेव्हां मला शंका येऊं लागली, तेव्हां मला तें चमत्कारिक वाटलं. माझी शंका खोटी असेल अशी माझ्या मनाची समजूत घालण्याचा मीं प्रथम कांहीं दिवस प्रयत्न केला; पण माझ्या मनाची समजूत पडेना. एखाद्या वेळेस चांदणं नसतांहि माधव रात्रीच्या प्रहरीं बाहेर जाई अन् दोन दोन घटका परत येत नसे. एकदा चुकून मी पहाटे जागा झालों तों टेबलावर दोन्ही हातांचा विळखा करून त्यावर डोकं टेकून माधव खुर्चींत बसला होता. मीं रात्रीं खोलींत परत यावं तों गणिताचीं लठ्ठ लठ्ठ पुस्तकं माधवच्या टेबलावर पसरलेलीं दिसावींत, पण तो कागदावर गणिताखेरीज दुसरंच कांहीं तरी लिहीत आहे असं आढळून यावे, असंहि कित्येकदा

झालं. तो कसल्या तरी विचारांत होता खास. ती गोष्ट तो मला कां सांगत नाहीं, अशी विवंचना मला वाटूं लागली. एकदोनदां मीं त्याला स्पष्ट विचारून पाहिलं; पण माझी दृष्टि चुकवून तो म्हणाला, ' छे; कांहीं नाहीं बुवा. तुझी आपली भलतीच शंका.' तो हंसला; पण तें हसणं अगदीं कृत्रिम होतं.

अशा परिस्थितींत एके दिवशीं तिन्हीसांजा मी खोलीवर परत आलों. दुपारच्या नाटकाच्या खेळाला म्हणून मी तीन वाजतांच गांवांत गेलों होतों. पण नाटक इतकं रद्दी कीं माझं डोकं मनस्वी दुखूं लागलं. म्हणून मी उठून परत आलों. मीं दारावर टक्टक् केलं, पण आंतून माधवनं उत्तर दिलं नाहीं. दारावर पुन्हा बोट वाजवतांना मी हांक मारली, ' माधव ! ' त्यानं ' ओ ' दिली नाहीं, पण दाराचा बोल्ट काढला. मी आंत पाऊल टाकून पाहातों तों धोतराच्या सोग्यानं तो डोळे पुशीत होता. त्याला घट्ट धरून ' माधव, हें रे काय ? ' असं मी त्याला विचारणार, तोंच माझी दृष्टि त्याच्या खुर्चीकडे गेली अन् त्या खुर्चींत बसलेली व्यक्ति पाहतांच मी जागच्या जागीं खिळूनच उभा राहिलों !

आमच्या कॉलेजांतील सर्वांत लावण्यवती म्हणून गाजलेली विद्यार्थिनी सुजाता माधवच्या खुर्चींत बसून ढसढसा रडत होती !

काय करावं अन् काय बोलावं तें मला क्षणभर सुचेचना; मण मग दुसऱ्याच क्षणीं ' I'm sorry असं म्हणून मी खोलीच्या बाहेर पडलों अन दार ओढून घेतलं.

माधवच्या वृत्तींतल्या अलीकडील फरकाचं कारण कळल्यामुळं माझ्या मनाचा विस्मय नाहींसा झाला; पण आतां विस्मयाची जागा भीतीनं घेतली. माधव आणि सुजाता एकमेकांवर अनुरक्त झालेलीं असलीं तरी त्याचे चांगले परिणाम मुळींच होणार नाहींत अशी माझी खात्री होती. सुजाता ही एका संस्थानिकांची पुतणी होती. माधव हा एक दरिद्री तरुण होता.

योग्य संधी पाहून मीं माधवला म्हटलं, ' माधव, तूं विस्तवाशीं खेळतो आहेस ! '

तो म्हणाला, ' कुणी सांगायला नको आहे मला तें. '

' पण तुझा मित्र म्हणून तुला सावध करणं माझं कर्तव्य आहे. '

' पण या गोष्टी अशा असतात, कीं अगदीं जिवलग मित्रालासुद्धां त्यांचं खरं स्वरूप कळणं शक्य नसत. ज्याच्या त्यानं त्या कराव्यात अन त्यांतून मिळालं तर सुख नाहीं तर दुःख भोगायला तयार असावं. '

' पण माधव, तूं हें लक्षांत घेत नाहींस कीं— '

' तूं मला काय सांगणार तें मला पूर्ण माहीत आहे. उलट, तूंच हें लक्षांत घेत नाहींस, कीं मी आणि सुजाता—'

मग तो किती वेळ तरी बोलत राहिला. तीं दोघं आपल्या प्रेमापासून परावृत्त होणार नाहींत हें मला उघड दिसलं. पण त्यामुळं माझ्या मनांतलं भय कमी होण्याऐवजीं अधिकच वाढलं.

आणि माझी भीति अखेर खरी ठरली. सुजाताला घेऊन पळून जाण्याचा बेत माधवनं केला; पण तो साधला नाहीं. त्यांच्या प्रेमाची स्फुटता कशी झाली कुणास ठाऊक; पण एके दिवशीं सुजाताच्या संस्थानिक चुलत्यानं तिची अकस्मात् उचलबांगडी केली.

पुढं दोन महिन्यांनीं सुजाताचा विवाह झाल्याच्या बातम्या मीं वर्तमानपत्रांत वाचल्या. भाऊसाहेब नांवाच्या एका छोटेखानी संस्थानच्या राजेसाहेबांची सुजाता राणी झाली होती. या लग्नाला ती कबूल कशी झाली, याचं मला प्रथम आश्चर्य वाटलं. पण नंतर जेव्हां तिच्या परिस्थितीचा मीं विचार केला, तेव्हा एखाद्या गुन्हेगाराला पकडून तुरुंगांत टाकतात त्याप्रमाणं तिचं लग्न कसं उरकण्यांत आलं असेल त्याची मला कल्पना आली.

सुजातासारख्या अत्यंत सुंदर व विद्याविभूषित मुलीचा सारा जन्म आतां एका निर्बुद्ध आणि व्यसनी संस्थानिकाच्या राजवाड्यांत जाणार ही कल्पना मला मोठी दुःखदायक वाटली. उच्च कुळांत जन्म मिळणं हें भाग्य कीं शाप असा प्रश्न माझ्या मनांत सारखा येऊं लागला.

माधव जो नाहींसा झाला त्याची मला पुढं कांहींच हकीकत समजली नाहीं.

सुजातालाहि त्यानंतर मीं कधींच पाहिलं नाहीं. परंतु संस्थानिकां-च्या घरच्या हकीकती लोकप्रवादाच्या मार्गानं चव्हाट्यावर येत असतात या सामान्य नियमाला अनुसरून राजे भाऊसाहेब यांच्याबद्दलच्या ज्या गोष्टी मधून मधून माझ्या कानावर येत, त्यांवरून सुजाता पराकाष्ठेच्या दुःखांत दिवस कंठीत असली पाहिजे एवढं मला समजत होतं. राजे भाऊसाहेब यांच्या छोट्या संस्थानचं उत्पन्न पुरतं एक लाखाचंसुद्धा नव्हतं. पण त्यांचा खाजगी खर्चच वर्षाकांठीं एक लाखपर्यंत जात असे! अर्थात् गरीब रयतेकडून जुलुमजबरदस्तीनें पैसे पिळून काढण्याच्या सगळ्या वाममार्गांचें अवलंबन भाऊसाहेबांनीं आज कित्येक वर्षे सतत चालविलं होतं. वरिष्ठ अधिकारी गप्प राहावेत व पदच्युत होण्याचा प्रसंग स्वतःवर येऊं नये अशासाठीं छोट्या संस्थानिकांना ज्या गोष्टी कराव्या लागतात त्याहि भाऊसाहेब अर्थातच करीत होते, व त्यांत कित्येक हजारांच्या मापानं प्रजेचा पैसा खर्च होत होता. राजेलोकांना अधिकाधिक व्यसनी, जुलुमी व मूर्ख करण्यांतल्या हुशारीच्या भांडवला वर जगणारी जी एक भयंकर जात आहे त्या जातीच्या लोकांनीं भाऊ-साहेबांना पक्कं वेढलेलं होतं. राज्यांत जसा प्रजेचा, तसा राजवाड्यांत सुजा-ताचा परोपरीनं छळ होत होता. तिला मूल झालं नव्हतं, होणं शक्य नव्हतं. आपल्या ठिकाणचं व्यंग झाकण्यासाठीं भाऊसाहेबांनीं कित्येक वेश्या पदरीं ठेवल्या होत्या. सुजाताला मारहाण झाल्याच्या हकीकतीहि लोक कधीं-कधीं बोलत. एकदा सुजातानं पळून जाण्याचा प्रयत्न केला, पण तो तर साधला नाहींच. आणि उलट त्यामुळं तिचा छळमात्र वाढला.

या सगळ्या गोष्टी मला आठवल्यामुळं भाऊसाहेबांचा नोकर त्यांच्या दुखण्याची जी हकीगत मला सांगत होता तिकडे माझं धड लक्ष नव्हतं. मला जेव्हां तो नोकर म्हणाला, 'डॉक्टरसाहेब, नीट ऐकलंत ना मीं काय म्हटलं तें?' तेव्हां मी जरासा दचकल्यावांचून राहिलों नाहीं. त्याला ती हकीकत पुन्हा सांगायला लावणं मला भाग होतं.

असं दिसलं, कीं भाऊसाहेबांना त्या दिवशीं दुपारीं तीन वाजण्या-

च्या सुमारास एकाएकीं एक जुलाब झाला होता व त्यानंतर पांचसहा जुलाब झाले होते. पहिल्याच जुलाबापासून त्यांना थकवा येऊं लागला होता व आतां तर ते अगदीं निपचित पडून होते. कुणीं कांही विचारलं तरी बोलण्याची शक्ति त्यांना उरली नव्हती. त्यांच्या साऱ्या नोकरांनीं ठरविलं होतं त्यांना कॉलरा झाला असावा. अन् ते सारे घाबरून गेले होते.

मीं भाऊसाहेबांच्या डोळ्यांकडे नीट पाहिलं; कॉलरा झालेल्या माणसाचे डोळे भयंकर आंत गेलेले आणि ओढलेले दिसतात तसे त्यांचे मला दिसले नाहींत. मीं त्यांची नाडी हातीं घेऊन पाहिली, तीहि अगदीं मंद असण्याऐवजीं बरी होती. जीभ अगदीं कोरडी नव्हती. ‘ त्यांना सारखा चिकट घाम येतो का ? ’ असं मीं विचारलं, तेव्हां नोकर म्हणाले, ‘ नाहीं. ’ ‘ पोटऱ्या वळताहेत का सारख्या ? ’ असं मीं भाऊसाहेबांना विचारलं, तेव्हा त्यांनीं ‘ नाहीं ’ अशा अर्थानं मान हालविली.

कॉलऱ्याचीं चिन्हं मला मुळीच दिसेनात. कॉलऱ्यासारखाच भास-णारा पण भिन्न लक्षणांचा ‘ डायरिया ’ भाऊसाहेबांना झाला असला पाहिजे.

भाऊसाहेबांच्या उशागतीं उभ्या असलेल्या नोकराकडे मीं वळून पाहिलं अन् मीं म्हणणार होतों, ‘ हा कॉलरा नाहीं; तुम्ही मुळीच घाबरूं नका ! ’

पण तितक्यांत माझ्या विचारांना कोठून कसली कलाटणी मिळाली कुणास ठाऊक ! माझ्या तोंडून अगदींच निराळे शब्द बाहेर पडले ! मीं त्याच्या कानांत म्हटलं,

“ हा फार भयंकर स्वरूपाचा कॉलरा आहे. ”

“ अरे बापरे ! मग ? ”

“ घाबरूं नका. मी माझ्या प्रयत्नांची शिकस्त करतों. ”

असं म्हणून मी खुर्चीवरून उठलों. ज्या टेबलावर दिवा होता त्या टेबलावर मीं आपली बॅग ठेवली. मीं तिच्यांतून कोणतं औषध काढलं हें

कुणाला समजणार नाहीं अशी दक्षता घेतली अन् भरपूर एक ग्रेन मॉर्फियाचं इंजेक्शन भाऊसाहेबांना देऊन मी त्या बंगल्यावरून परतलों.

दुसऱ्या दिवशीं मीं आपला गिरसप्पाचा मुक्काम हलविला.

नावेंत बसून काळी नदी ओलांडून ब्रिटिश हद्दीकडल्या तीरावर आलों तेव्हां तिथं नावाडी लोकांचं आपसांत बोलणं चाललं होतं त्यावरून मला समजलं, कीं ब्रिटिश डाक बंगल्यांत उतरलेले राजेसाहेब सकाळीं आपल्या अंथरुणांत मेलेले आढळले होते. त्यांना रात्रीं जी झोप लागली होती ती कायमचीच !

मीं दिलेल्या मॉर्फियानं काम केलं होतं.

' सुजाता सुटली ' असं मनाशीं म्हणत मीं आपला प्रवास पुढं चालू केला. "

* * * *

एवढी हकीगत सांगून डॉक्टर जोशी स्तब्ध झाले.

माझ्या मनांत एक निराळाच विचार आला आणि मीं त्यांना विचारलं, " तुमचा मित्र तो माधव कुठं गेला तें तुम्हांला अजूनहि कळलेलं नाहीं का ? "

डॉक्टरांनीं एक निश्वास सोडला. " नाहीं. मीं पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याचा पत्ता मला लागला नाहीं. अन् त्याचा पत्ता लागेना तेव्हां प्रथम माझी फार निराशा झाली. कारण खरं म्हणशील तर ज्या क्षणीं सुजाताच्या नवऱ्याला मॉर्फिया देऊन मारून टाकायचं मीं मनाशीं ठरविलं, त्या वेळीं मला माधवचा शोध लावतां आला तर त्याची आणि सुजाताची पुन्हां गांठ घालून देण्याची कल्पना माझ्या मनांत आल्यावांचून राहिली नव्हती. सुजाता एका संस्थानिकाची बायको, ती विधवा झाली तरी पुनर्विवाह करणं तिला कुठलं शक्य व्हायला, इत्यादि अडचणींचं भान त्या क्षणीं मला राहिलं नव्हतं. माधवचा शोध मला लागला असता, सुजातानं मनोधैर्य दाखविलं असतं, अन् त्या दोघांचं मीलन झालं असतं तर माझं कृत्य मला पूर्ण समर्थनीय वाटलं असतं. "

" म्हणजे आतां तुमच्या कृत्याबद्दल तुम्हांला थोडासा पश्चात्ताप होतो असं म्हणतां कीं काय?"

" छे छे, तसं मुळींच नाहीं. माधव मला पुन्हा भेटला असता तर मला किती आनंद झाला असता हें सांगण्यापुरतंच मी तसं म्हटलं. त्याचा शोध लागेना, तेव्हा प्रथम कांहीं दिवस माझं मन फार कष्टी झालं; पण नंतर हळूहळू मीं असं म्हणून आपल्या मनाचं समाधान करूं लागलों, कीं प्रेमसाफल्याच्या स्वर्गांत जरी मला सुजाताला नेतां आलं नाहीं, तरी तिची नरकांतून सुटका करून तिला निदान पृथ्वीवर मीं आणलं हें काय थोडं झालं?"

मीं विचारलं, " तुमची आणि सुजाताची आजपर्यंत कधीं भेट झाली नाहीं?"

" नाहीं. पण त्या संस्थानची विधवा राणी या नात्यानं तिनं लोककल्याणाचीं पुष्कळ कामं केलीं अन् प्रजेचं प्रेम संपादलं, त्याच्या हकीकती मीं ऐकल्या आहेत. तूंहि वर्तमानपत्रांत त्या वाचल्या असशील. दोन वर्षांपूर्वी मुंबईस सामाजिक परिषदेंत तिचं व्याख्यान झालं तेव्हां तिला दुरून पाहिलं, अन् त्या वेळीं माझी खात्री झाली, कीं प्रेमपूर्तीचं स्वर्गसुख तिच्या वांट्याला आलं नाहीं; पण आता निदान ती माणसासारखी तरी वावरते आहे."

डॉक्टरांची ती हकीकत आणि त्यांचे ते शब्द नंतर किती वेळ तरी माझ्या मनांत सारखे घोळत होते.

रात्रीं चांदण्यांत मी एकटाच व्हरांड्याच्या पायरीवर बसून धबधब्याकडे पाहात होतों तेव्हां पलीकडल्या ब्रिटिश डाकबंगल्याकडे माझी दृष्टि पुनःपुन्हा जात होती व डॉक्टरांच्या हकीकतींत ऐकलेला कित्येक वर्षांपूर्वीचा तो विलक्षण प्रसंग माझ्या डोळ्यादेखत पुन्हा घडत आहे असा भास मला वरचेवर होऊन मी आपल्या मनाला विचारत होतों—

डॉक्टरांचें तें कृत्य गुन्हा कीं सत्कृत्य? काय म्हणायचं?

---

# अंधारांतली तारका : : ७

तपासणी संपली तेव्हां डॉ. शामराव त्या गृहस्थास म्हणाले, " कपडे घाला तुम्ही आतां. " आणि रोगण लावलेल्या जाड कापडी अंतरपाटापलीकडच्या जागेंतल्या आपल्या खुर्चींत ते जाऊन बसले. एक सिगारेट शिलगावण्याची त्यांना घाई झाली होती. अनीतीचं पहिलं कृत्य करणाऱ्या पापभीरु माणसाची मनःस्थिति ते अनुभवीत होते. सिगारेटचा भरपूर झुरका घेतला कीं आपलं घाबरट मन जरा स्थिरावेल अतं त्यांना वाटत होतं—' त्यांना ' कशाला, ' त्याला ' वाटत होतं असंच म्हणूं. कारण डॉ. शामराव म्हणजे गल्लीगणिक दहा डॉक्टर झालेल्या मुंबई शहरांत नवा दवाखाना थाटून बसलेला एक पोरसवदा ' निरोगी ' ( म्हणजे ज्याच्याकडे रोगी येत नाहींत असा ) नवा डॉक्टर होता !

शामरावानं दवाखाना मांडल्याला दोन वर्षं म्हणजे चोवीस महिने होऊन गेले होते. पण या अवधींत त्याची मासिक प्राप्ति चोवीस रुपयांपर्यंतसुद्धां चढली नव्हती ! एका स्नेही वकिलाचे कागद नकला कराय-

साठीं तो घेऊन येई आणि रोग्यांची वाट पाहात दवाखान्यांत बसल्या-बसल्या टाइपरायटरवर त्यांच्या नकला करी. डॉक्टरीच्या धंद्यांत मिळणाऱ्या पैशांत तो अशा प्रकारें बरीच भर घाली व पन्नाससाठ रुपयांवर कसाबसा जगे. टायपिंग करीत असतांना कोणी दवाखान्यांत आलं कीं तो सारे कागद लपवून ठेवी व "आपण एका नामांकित इंग्रजी वैद्यकीय मासिकासाठीं एक मोठ्या महत्त्वाचा संशोधनात्मक निबंध तयार करीत आहोंत, त्याचे ते कागद आहेत" असं सांगे.

आपला डॉक्टरीचा धंदा चांगला चालूं नये याचा शामरावला भारी विषाद व विस्मय वाटे. कॉलेजच्या अभ्यासक्रमांतल्या प्रत्येक परीक्षेंत तो अगदीं पहिल्या वर्गांत पास होत गेला होता. तीनचार बक्षिसहि त्यानं मिळविलीं होतीं. म्हणजे शास्त्रीय ज्ञानाची कसोटी लावली तर तो अगदीं उत्तमांतला उत्तम डॉक्टरही ठरायला हरकत नव्हती. बरं, स्वभावानं पाहिलं तरी तो नम्र व मधुरवचनी होता. निदान अलीकडे अलीकडे धंद्यांतल्या अपयशामुळं अन् गरिबीमुळं त्याच्या ठिकाणीं आलेला किंचित् तुसडेपणा वजा केला तर त्याचा मूळचा स्वभाव आनंदी आणि गोडच होता; पण असं असूनहि धंद्यांत त्याला यश मिळत नव्हतं. त्याच्याजवळ ज्ञान होतं, नैपुण्य होतं, लोकांना रोगमुक्त करून त्यांची सेवा करण्याची सात्विक इच्छाहि होती; पण समाजाला त्याची सेवा अन् त्याची हुषारी नको होती. असं कां बरं!

या प्रश्नाचा विचार करतांकरतां शामरावाची खात्री पटूं लागली होती, कीं हा सारा सध्यांच्या चमत्कारिक समाजरचनेचा दोष आहे. ज्या थोड्या डॉक्टरांचा धंदा चांगला बसलेला आहे त्यांना मोठमोठ्या इस्टेटी करण्याचा लोभ आहे. खाजगी मालमत्ता हवी तितकी करायची मोकळीक आजच्या समाजानं त्यांना ठेवलेली आहे आणि या परवानगीचा ते भरपूर फायदा घेत आहेत; ते मिरासदार बनत आहेत. दोन हजारांची मासिक प्राप्ति तीन हजारांवर कशी जाईल या विवंचनेंत ते आहेत. रोग्यांच्या रोगनिवारणावर नव्हे, तर स्वतःची मिळकत वाढविण्यावर त्यांचं सारं लक्ष आहे. दोनशेंऐवजीं अडीचशें रोग्यांची थाप दवाखान्यांत उडाली, एकेकाची धड नाडी पाहण्यापुरताहि वेळ उरेनासा झाला, तरी

ते कांहीं प्रामाणिकपणानं असं सांगणार नाहींत कीं, " मला वेळ नाहीं, तुम्ही शेजारच्या डॉक्टरकडे जा, तोहि चांगला आहे. " डॉक्टरी म्हणजे दुकानदारी झाली आहे आणि मोठ्या कारखानदारांनीं छोट्या कारखानदारांना आपल्या पैशाच्या जोरावर गिळून टाकावं, तद्वत् मोठे डॉक्टर नव्या छोट्या डॉक्टरांना खाऊन टाकीत आहेत. त्यांच्या लोभाला आड-काठी नाहीं, त्यांनीं खाजगी मालमत्ता किती करावी याला मर्यादा नाहीं. त्यामुळं धंद्यांत जिकडे तिकडे स्पर्धेचा बुजबुजाट झाला आहे, अन् ज्याच्या हातांत पैसा खुळखुळतो तो डॉक्टर मोठा असा न्याय होऊन, एक मेंढरू गेलं की सारा कळप त्याच्यामागं धाव घेत जातो त्याप्रमाणं हे गाढव लोक बड्या नांववाल्या डॉक्टरांकडे धाव घेत आहेत. इथं खऱ्या ज्ञानाची अगर कौशल्याची मात्रा फार क्वचितच चालणार. ही सारी घाण नाहींशी करायची असेल, धंदा स्वच्छ करायचा असेल, तर खाजगी मालमत्ता करायची परवानगीच समाजानं डॉक्टरला— डॉक्टरलाच कशाला, कुणालाच ठेवतां कामा नये. मग पाहूं होतकरू नव्या तरुण डॉक्टरांना कसं उपाशी रहावं लागेल तें!...

पण या " मग " चा काय उपयोग होता !

आजची परिस्थिति अशीच होती, कीं केवळ ज्ञानाच्या, हुशारीच्या अन् प्रामाणिक कष्टांच्या बळावर उदरनिर्वाह करूं पाहणाऱ्या डॉक्टरला सतत व्यर्थ धडपड करण्यावांचून गत्यंतर नव्हतं.

या धडपडीला शामराव कंटाळला होता व अखेर अनीतीचं कृत्य करायला तो तयार झाला होता. ज्या वकिलांचे कागद तो नकला करायसाठीं आणीत असे, त्यांच्या ओळखीनं एका विमा कंपनीच्या विमेदाराची तपासणी करायचं काम त्याला मिळालं होतं. त्या कामांतच धडधडीत लबाडी करून पैसे मिळवायचा त्यानं निश्चय केला होता. त्या कृत्यांतच तो या वेळीं गुंतला होता.

त्याच्याकडे तपासणीसाठीं आलेला हा किरकोळ प्रकृतीचा गृहस्थ त्याला पन्नास रुपये देणार होता व त्या मोबदल्यांत त्या गृहस्थाचा आरोग्याबद्दल विमा-कंपनीकडे उत्तम रिपोर्ट लिहून पाठवावयाचं त्यानं

कबूल केलं होतं.

शामरावच्या आयुष्यांतलं धडधडीत लबाडीचं तें पहिलं कृत्य होतं अन् त्यामुळं विवेकबुद्धि त्याला सारखी छेडीत होती.

तिला गप्प करायसाठींच आपल्या खुर्चीवर बसल्याबरोबर त्यानं सिगारेट शिलगावली. तिचा त्याला हवा तो परिणामहि लगेच झाला. सिगारेटच्या धुराचीं वलयं जसजशीं हवेंत तरंगून विरूं लागलीं, तसतशी विवेकबुद्धीची निर्भर्त्सनाहि विरूं लागली. शामरावाचं मन म्हणूं लागलं, मी जें करतों आहे तें म्हटलं तर पाप, म्हटलं तर नाहीं. या गुजराथी गृहस्थाची प्रकृति अगदीं शंभर नंबरी कणखर नाहीं हें खरं. त्याला थोडासा दम्याचा विकार आहे, कबूल. त्याची छाती पुरती तीस इंच-सुद्धा नाहीं, कबूल. त्याचं वजन चौऱ्याण्णव पौंड आहे, कबूल. अन् या दृष्टीनं त्याच्या प्रकृतीच्या दाखल्यावर त्याची प्रकृति अगदीं एक नंबरची आहे म्हणून शेरा देणं कांहीं मोठं सचेपणाचं कृत्य नव्हतं. पण उलटपक्षीं असाहि एक विचार करण्यासारखा होता, कीं तसा दाखला दिला म्हणून विमा कंपनीचं कांहीं नुकसान होण्यासारखं नव्हतं. पंचावन्नाव्या वर्षापर्यंत हा गृहस्थ जगणार यांत शंका नव्हती. हीं असलीं सुक्या खारकेसारखीं माणसं लवकर मरत नाहींत. दमेकरी लोक तर बेटे भारी चिवट. खोकून खोकून कासावीस होतील पण प्राण सोडायचे नाहीत जीव गेला तरी! अन् शिवाय या गृहस्थाचं नांवच मुळीं अपमृत्यू-विरुद्ध जबरदस्त गॅरंटीसारखं होतं. काय बरं नांव?...हां. ' प्राणजीवन अमरसी '!...काय बिशाद मरतोय् हा साठीच्या घरांत पोचल्याशिवाय! इत्यादि विचारांनीं शामरावाचा धीर चांगलाच दृढ झाला. स्वतःच्या भित्र्या विवेकाची त्याला कींव आली आणि त्या गृहस्थाच्या नांवा-वर जी कोटी त्याला सुचली तिच्यामुळं स्वतःशींच किंचित हंसायलासुद्धां त्यानं कमी केलं नाहीं.

प्राणजीवनानं निरोप घेतांना हलकेंच पांच नोटा त्याच्या टेबलावरच्या टिपकागदाखालीं ठेवल्या व म्हटलं, "डॉक्टरसाहेब पण आमचं काम अगदीं चोक्कस झालं पाहिजे हं ! "

शामराव हसून म्हणाला, "तुम्ही निश्चिंत असा हो. पण शेटजी, हें पाहा ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये हं."

तोंडानं च्यक्‌च्यक् असा आवाज करून आणि कां कोणास ठाऊक, स्वतःचा कान पकडल्यासारखं करून प्राणजीवन म्हणाला,

" वा डॉक्टर ! हें काय सांगितला पायजे काय ? लबाडी करायची तर सचोटीबिगर चालत नाय हें तुमी आमाला शिकवते काय ? हाःहाः ! बरं जाऊं ? जय जय ! "

प्राणजीवन जिना उतरून खालीं गेला.

त्यानं ठेवलेल्या पांच नोटा शामरावाच्या खिशांत गेल्या !

भांडवली समाजानं आजवर त्याच्यावर आघात केले होते, त्यांचा प्रतिकार करायचं हत्यार—लबाडी—वापरायला आज तो शिकला होता. ज्या हत्याराच्या साहाय्यानंच दुर्बलांना या भांडवली समाजरचनेंत जगतां येतं, तें त्यानं आज प्रथम वापरलं होतं. कुऱ्हाड हातीं येतांच झाडावर पहिला प्रहार करतांना जॉर्ज वॉशिंग्टनसारख्या बच्चाला शक्तीचा प्रत्यय येऊन जो आनंद होतो तो शामरावला झाला होता.

त्या आनंदांतच त्यानं आणखी एक सिगारेट पेटवली. जिन्यावर पावलं वाजलीं, तेव्हां त्याला वाटलं कोणीं पेशंट आला असेल. पण पाहातो तों पोस्टमन. पण तो निराश झाला नाहीं. पन्नास रुपये खिशांत घातल्याच्या आनंदांत तो होता. पोस्टमननं जें एकच पत्र टेबलावर टाकलं तें फोडून तो वाचूं लागला.

पत्र त्याच्या वडिलांकडून आलं होतं. त्यांनीं लिहिलं होतं—

" कळविण्यास आनंद वाटतो कीं, चि. मथूचं लग्न एकदाचं जुळलं. स्थळ कांहीं अगदीं उत्तम आहे असं नाहीं; पण वाईटहि नाहीं. मुलाला चाळीस रुपयांची कायम नोकरी आहे. घरची थोडी जमीन आहे. दीड हजार रुपये हुंडा ठरला आहे. करणीचे तीनशें रुपये. माझ्या शक्तीच्या बाहेरचंच सगळं. पण मथूला आतां एकविसावं लागायची वेळ आली होती. सोसायटींतून दोन हजार रुपयांचं कर्ज काढलं आहे. मनाशीं म्हटलं, शामूच्या लग्नाच्या वेळीं चार हजार हुंडा घेऊं अन् सारं कर्ज..."

तें वाक्य शामरावानं पुरतं वाचलं नाहीं. पत्रसुद्धा पुरतं न वाचतां टेबलावर टाकून द्यावं असं त्याच्या मनांत आलं. त्यानं तें दूर केलंहि; पण तेवढ्यांत त्याला पत्राच्या अखेरचीं वाक्यं दिसलींच—

" या मंगलकार्याला तूं चारसहा दिवसांची सवड काढून यायला हवं. मला घरांत मदतीला पुरुष माणूस कोणी नाहीं. मुहूर्त नक्की झाला कीं तुला कळवितों..."

शामरावानं टाक उचलला अन् पत्रांतल्या 'मंगल कार्याला' या शब्दांवरून जाड रेघ मारली व डाव्या बाजूच्या कोऱ्या जागेंत मोठं प्रश्नचिन्ह केलं. जणुं तो एखाद्या विद्यार्थ्याचा पेपर तपाशीत होता, त्यांतल्या चुकीच्या शब्दप्रयोगावर त्यानं काट मारून ठेवला होता, अन् तो विद्यार्थी भेटला कीं तो प्रयोग किती चुकीचा आहे तें त्याला नीट समजावून सांगणार होता. खरंच, असल्या या हुंड्यावर आधारलेल्या लग्नांना 'मंगलकार्य' ही संज्ञा कां द्यायची तें शामरावाला कळत नसे.

त्याला एकंदर चार बहिणी होत्या आणि या बहिणींमुळेच त्याला स्वतःला आज धंद्यांत उमेदवारी करीत धडपडावं लागत होतं. चारी भावंडांत तो स्वतःच काय तो नीटस अन देखणा होता. त्याच्या साऱ्या बहिणी वर्णानं काळ्या अन् नाकाडोळ्यांनीं सदोष होत्या. तिघींच्या लग्नांसाठीं एकंदर पांचसहा हजार रुपये घरांतून गेले होते. त्यामुळं वैद्यकीय पदवी मिळविल्याबरोबर शामरावाला स्वतःच्या पायांवर उभं राहणं भाग पडलं होतं, अन् दवाखान्यांत गुंतवायसाठीं पुरते पांचशें रुपयेहि वडिलांकडून त्याला मिळाले नव्हते. आपल्याला चार बहिणी नसत्या तर—किंवा निदान त्या रूपानं आपल्याइतपत बऱ्या असत्या तर—आपण दवाखाना जरा अधिक थाटानं सजवूं शकलों असतों; बोरभाट गल्लीसारख्या दरिद्री मोहल्ल्याऐवजीं लॅमिंग्टन रोडवर आपण दवाखाना मांडूं शकलों असतों, व आज आपल्या धंद्याचा जम चांगला बसला असता, असं शामरावाच्या मनांत वारंवार येई. आपल्या आजच्या दुःस्थितीला आपल्या बहिणी कारण होत, असं उघड म्हणणं बंधुप्रेमाला शोभण्यासारखं नाहीं हें त्याला समजत असे; पण तो विचार खरा

असल्यामुळं त्याला तो आपल्या मनाबाहेर घालवितां येत नसे; आणि बहिणींचा द्वेष वाटण्याऐवजीं त्यांच्या रूपांबद्दल त्याला कीवच वाटे हें जरी खरं असलं, तरी ज्या विचित्र सामाजिक रचनेमुळं त्यांचं साधं रूप ही एक मोठी आपत्ति ठरली व हुंडा हाच एक त्या आपत्तीवर इलाज ठरला, त्या रचनेचा त्याला द्वेष वाटल्यावांचून राहत नसे. आणि असल्या लग्नाचं वर्णन 'मंगल कार्य' या काव्यमय शब्दांनीं व्हावं, याची त्याला चीड आल्यावांचून राहत नसे.

आपलं लग्न म्हणजे सारं कर्ज निवारण्याइतका पैसा मिळविण्याची संधि, अशी आपल्या वडिलांची दृष्टि असावी, हें त्याला शोचनीय वाटे. पण या विचारसरणीबद्दल तो आपल्या वडिलांना दोष द्यायला इतका उत्सुक नव्हता. कारण त्याला हें समजत होतं कीं, भांडवली समाजाच्या जगड्व्याळ यंत्रांत आपला बाप इतर बापांप्रमाणं सांपडला आहे आणि आपल्या बापाला या भांडवली विचारसरणीवांचून दुसऱ्या विचारसरणीचा अवलंब करणंच शक्य नाहीं. ज्या समाजांत सारेच लहानमोठे व्यवहार खाजगी मालमत्तेच्या अन् एकांगी स्पर्धेच्या तत्वावर चालले आहेत, त्या समाजांत तरुणांच्या विवाहाचा प्रश्नहि पैशाच्या हिशोबानंच सोडविला जावा हें क्रमप्राप्तच होय. गिरणीवाले कामकऱ्यांच्या सुखदुःखांपेक्षा स्वतःची जिंदगी कशी वाढेल ही एकच चिंता ठेवतात. तद्वतच ज्यांचं लग्न व्हायचं त्यांच्या सुखदुःखाची फिकीर न करतां बापांनीं आपापल्या जिंदगीच्या दृष्टीनं तीं ठरवावीं, हें आजच्या विकृत समाजरचनेंतून उद्भवणाऱ्या अनेक शल्यांपैकीं एक शल्य होतं. या अनिष्ट प्रकाराबद्दल कुणाच्याच बापाला दोष देऊन भागण्यासारखं नव्हतं. सगळ्यांना या भांडवली समाजाचा राग व वीट आला तरच हीं हास्यास्पद 'मंगल कार्यें' थांबण्यासारखीं होतीं....

अशा या वारंवार मनांत येणाऱ्या विचारांची पुनरावृत्ति करतां-करतां शामरावानं पत्रावर केलेलं प्रश्नचिन्ह पुनःपुन्हा गिरवलं.

तें प्रश्नचिन्ह जेव्हां बिगर इयत्तेंतल्या मुलाच्या अक्षराएवढं जाड झालं तेव्हां तो भानावर आला! मग त्यानं स्वतःशींच हसल्यासारखं करून टाक टिपकागदावर टाकून दिला आणि पुन्हा एक सिगारेट पेटविली.

समाजरचनेबद्दलचीं सारीं मतं बाजूला सारून मथूच्या लग्नाला जाणं त्याला भाग होतं अन् जाण्यायेण्याच्या भाड्यापुरते पैसे तरी कुठून आणा-यचे अशी त्याला एरवीं जी विवंचना पडली असती ती आज सुदैवानं उरली नव्हती. त्यानं खिशांतल्या पांच नोटा चाचपून पाहिल्या आणि तो मनाशीं म्हणाला, "प्राणजीवन अमरसी, चिरंजीव हो बेटा! कशी ऐन वेळेस तुझी ही कुमक आली आहे तुला कल्पना नाहीं."

"मथूच्या लग्नाला अवश्य येतों" म्हणून त्यानं वडिलांना पत्र लिहिलं आणि योग्य दिवशीं तो आपल्या घरीं हजरहि झाला!

मथूचं लग्न झालं. वऱ्हाड जमलं, मिरवणुकी निघाल्या, जेवणावळी झाल्या, अन्न वाया गेलं, वाजंत्रीं वाजलीं, भांडणं झालीं, रुसणींफुगणीं झालीं. पैशाचा चुराडा झाला—पण मथू एकदाची बापाच्या घरांतून सासरीं गेली. या दृष्टीनं जो तो म्हणाला—"कार्य निर्विघ्नपणानं पार पडलं."

थोडीशी स्वस्थता मिळतांच शामरावाचे वडील त्याला म्हणाले,

"जबलपूरच्या एका वकिलांची मुलगी सांगून आली आहे तुला.. ते उद्यां इथं येणार आहेत मुलीला घेऊन. पत्रिका उत्तम जुळली आहे. चांगली श्रीमंताची मुलगी आहे. तूं पाहून पसंत केलीस म्हणजे..."

बापलेकांत लग्नाचं बोलणं मागेंहि पुष्कळदां झालं होतं. दर वेळीं शाम-राव म्हणाला होता,

"माझा धंद्याचा जम नीट बसूं द्या, मग पाहतां येतील मुली."

आजहि तेंच उत्तर त्यानं दिलं अन् त्याला वाटलं तेवढ्या उत्तरावर भागेल; पण तसं भागलं नाहीं. त्याचे वडील म्हणाले,

"तुझ्या धंद्याचा जम बसेपर्यंत वाट पाह्यची म्हणजे माझ्या डोळ्या-देखत कांहीं तुझं लग्न व्हायची आशा नको. आमचीं लग्नं झालीं तेव्हां—"

"तेव्हां काय?" शामरावानं एकदम विचारलं. आपल्या धंद्यांत आपण सदा असेंच धडपडत राहणार असं आपल्या वडिलांनीं ध्वनित करावं याची शामरावाला फार चीड आली व ती त्याच्या स्वरांत व्यक्त झाल्यावांचून राहिली नाहीं.

त्याच्या वडिलांनीं त्याच्या रागीट स्वराकडे दुर्लक्ष करून म्हटलं,

"आमचीं लग्नं झालीं तेव्हां आम्हांला अवघे पंधरा रुपये मिळत होते. पंधराचे पंचवीस होस्तवर आम्हीं वाटहि पाहिली नाहीं, अन् अमकी मुलगी पसंत अन् अमकी नापसंत अशी वडिलांसमोर भाषा करण्याचा धीरहि आम्हांला झाला नाहीं! वडिलांनीं आमचं लग्न ठरवलं अन् आम्ही बोहल्यावर चढलों—"

" अन् संसाराच्या जंजाळांत पडलों ते कायमचे पडलों!" असं मोठ्यांदा म्हणून बापाचं तें वाक्य पुरं करावं असं शामरावाला फारफार वाटलं.

पण 'आलिकडच्चीं मुलं उद्धट झालीं' असं मोठ्या माणसांना कितीहि वाटलं, तरी सुद्धां मर्यादा ठेवायसाठीं जिभेवर आलेले शब्द तीं गिळतात.

त्यामुळं शामराव फक्त येवढंच म्हणाला,

" पण बाबा, एक दिवस तुम्हीं अचानकपणें ज्या मुलीची माझी धड ओळखहि नाहीं अशा एका मुलीला माझ्या स्वाधीन करावं अन् म्हणावं, ' ही आतां जन्माची तुझ्या हवालीं केली आहे; संभाळ हिला अन् हिच्या बरोबर सुखानं संसार कर ' हें सारं विचित्र अन् हास्यास्पद नाहीं का! मला तरी असलं लग्न करायचं नाहीं!"

" मग कसलं लग्न करायचं आहे! कुठल्या मुलीच्या नादीं लागला आहेस!"

" मुळींच नाहीं. प्रेमाच्या भानगडींत मी सांपडलों नाहीं अजून. त्या-बद्दल निर्धास्त असा तुम्ही."

" पण मग ही जबलपूरची मुलगी पाहयला काय जातं आहे तुझं!"

शामरावाला वाद वाढवायचा नव्हता. तो म्हणाला, " बरं पाहीन."

आणि दुसऱ्या दिवशीं मुलगी पाहण्याचा समारंभ झाला. त्याचे वडील, त्याची आई, घरांतलीं दोनचार म्हातारीं माणसं, इतकंच नव्हे, त्याच्या बहिणीसुद्धां म्हणूं लागल्या, " मुलगी अगदीं फक्कड आहे, शामूनं ती पसंत केलीच पाहिजे."

शामरावाला मोठा विस्मय वाटला!

त्यानं ती मुलगी अगदीं न लाजतां नीट पाहिली होती. ती काळी

होती, ताडमाड उंच होती, तोतरी असावी असा त्याला बळकट संशय आला होता, वाचतांना तिनं ज्या तऱ्हेनं पुस्तक धरलं त्यावरून ती 'तिरळी'ही होती कीं काय कुणास ठाऊक !

आणि इतकं असून वरांतल्या साऱ्या मंडळींना ती अगदी पुरेपूर पसंत असावी ! शामरावाला हें मोठंच कोडं वाटूं लागलं.

पण तें लवकरच उलगडलं. त्याला कळलं, कीं त्या मुलीचा बाप पांच हजार रुपये हुंडा द्यायला तयार आहे आणि या गळालाच आपल्या घरांतल्या माणसांचे मासे लागले आहेत !

त्याला अगदीं चीड आली त्या एकंदर प्रकाराची.

वडिलांनीं जेव्हां त्याचा विचार काय तें विचारलं तेव्हां तो म्हणाला,

" वकीलसाहेबांचे पैसे पसंत आहेत; पण त्यांची मुलगी—"

थोड्याशा विस्मयानें त्याच्या वडिलांनीं विचारलं— "म्हणजे काय ?"

" म्हणजे असं, कीं तुम्हांला हवे आहेत वकिलसाहेबांचे पैसे; ते छान आहेत. पण मला हवी आहे अशी बायको कीं जिच्याबरोबर मला सुखाचा संसार करतां येईल. अन् वकिलांची मुलगी कांहीं तशी नाहीं. "

शामरावाचे वडील संतापानं अद्वातद्वा बोलूं लागले. ते म्हणाले—

" हो हो. मला पैसे हवे आहेत. पुढ काय तुझं म्हणणं ? तुला लहानाचा मोठा केला, शिक्षण दिलं, चैन करूं दिली, हजारों रुपये खर्च केले, तुझ्या बहिणींचीं लग्न करून मी कर्जबाजारी झालों ! आतां तुझं कर्तव्य कांहीच नाहीं ? मला पैसे हवेसे वाटले तर माझं चुकलं कुठं ? कर्ज डोक्यावर घेऊन मेलों तर नरकांत जाईन. तुझ्या लग्नाचा हुंडा घेऊन डोक्यावरचा भार दूर करावा असं माझ्या मनांत आलं तर चुकलं कुठं ?"

आपल्या वडिलांनीं अगदीं बिनतोड म्हणून हा प्रश्न आपल्यापुढं टाकलेला आहे आणि त्यांना वाटतो तितका तो बिनतोड मुळींच नाहीं, या दोन्ही गोष्टी शामरावाला स्पष्ट दिसत होत्या. पण लग्नसंस्थेची किंवा समाजरचनेची चर्चा करण्याची ती वेळ नव्हती. म्हणून तो फक्त म्हणाला,

" बाबा, कर्जमुक्त व्हावंसं तुम्हांला वाटलं तर त्यांत कांहींच चुकलं नाहीं. पण माझ्या गळ्यांत कायमची चिंता बांधून स्वतः चिंतेंतून सुटावंसं

तुम्हांला वाटतं हें वावगं आहे येवढंच माझं म्हणणं. "

" वावगं म्हणायला काय होतं आहे ? आज तूं ही जबलपूरची मुलगी केलीस तर पांच हजार रुपये माझ्या घरांत येतील ! असे एक रकमेनं पांच हजार रुपये माझ्या हातीं देण्याचं दुसरं कोणतं साधन तुझ्याजवळ आहे सांग ! धंद्यांत सांचाविणार आहेस पांच हजार रुपये ! नाहींना ? मग पैशाचा लोभ न धरतां लग्न करण्याची भाषा हवी आहे कशाला ? उद्यां आणशील एखादी दरिद्रीनारायणाची मुलगी पसंत करून, करशील लग्न तिच्याशीं ! तुझ्या दृष्टीनं मोठा काव्यमय संसार सुरू होईल तुझ्यापुरता, पण मी राहीन कर्जबाजारी अन् तसाच अखेर मेलों कीं..."

" उगीच कां पुनःपुन्हां अभद्र बोलतां बाबा ? "

" अभद्र ! माझ्या गळयाला लागलेला चिंतेचा फास तुला कसा कळणार ? "

" कां नाहीं कळणार ? चांगला कळतो. धंद्यांत पांच हजार रुपये कमावून ते तुमच्या हवालीं करीन असं आश्वासन द्यायची ताकद माझ्या अंगीं नाहीं, तेव्हां मी तसं कांहीं म्हणत नाहीं. लग्नाच्या बाजारांत माझी कांहीं किंमत वसूल झाली तर होईल हें तुमचं म्हणणं मी कबूल करतों. अन् तुमच्या समाधानासाठीं असं आश्वासन देतों, कीं माझ्या पसंतीची एखादी मुलगी उद्यां मला आढळली तरी पांच हजार रुपये हुंडा मिळत असेल तरच मी तिच्याशीं लग्न करीन, नाहीं तर अविवाहित राहीन ! आतां तर झालं ? "

' आतां तर झालं ? ' या शामरावाच्या शब्दांचा नक्की अर्थ त्याच्या वडिलांना एरवीं कळला असता कीं नाहीं कोणास ठाऊक ! पण ते शब्द उच्चारून शामराव मुळीं तेथून उठून चालताच झाला ! त्यामुळं ते उमजले, कीं जबलपूरचं तें स्थळ हातचं गेलं असंच मानलं पाहिजे आणि लग्नाबद्दलची भाषा शामरावाशीं पुन्हा करण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं !

शामराव दुसऱ्या दिवशीं मुंबईस परत जायला निघाला, तेव्हां ते घुश्श्यांतच होते. " आज दुपारच्या एक्सप्रेसनं मी जाईन म्हणतों. "

असं शामरावानं सकाळीं त्यांना सांगितलं, तेव्हां ते म्हणाले—," जा कीं, तुला कोण आडवतो आहे!"

शामराव मनाशीं म्हणाला, " खूपच गरम झालेलं दिसतं आहे प्रकरण ! पण झालं तर झालं ! त्यावर फुंकर घालण्यांत अर्थ नाही !" त्यानं आपली बॅग भरायला सुरुवात केली.

त्याची सगळ्यांत थोरली बहीण त्याच्याजवळ येऊन जेव्हां म्हणाली, " अशी काय घाई लागली आहे तुला परत जायची ? राहा आजच्या दिवस !" तेव्हां त्याला जरा आश्चर्य वाटलं. आपल्या बहिणीचं आपल्यावर इतकं प्रेम असेल अशी त्याची कल्पना नव्हती.

तो म्हणाला, " अग, मांडवपरतणं झालं, सगळं कांहीं झालं. आतां कशाला राह्यचं ?"

" वा ! म्हणजे रे काय ? राह्यलंच पाहिजे तुला !"

शामराव फारच बुचकळ्यांत पडला. बंधुप्रेमाचा हा लोंढा त्याच्या अगदींच परिचयाचा नव्हता ! त्यानं सांगून पाह्यलं-" तिकडे दवाखाना बंद राहातो. तुझ्या नवऱ्यासारखा मला कांहीं पगार नाहीं मिळत !"

नवऱ्याचा उल्लेख ऐकतांच लाजून मुरका मारून ती म्हणाली, " बरं बरं ! राहिला एक अधिक दिवस दवाखाना बंद तरी कांहीं बिघडत नाहीं."

" अग, पण उद्यांच जाण्यांत काय मोठंसं आहे !"

" आहे. माझं एक लहानसं काम आहे. भिडेकाकूंची तारा माहीत आहे ना तुला ?"

"तारा ?" शामरावाला भिडेकाकू कोण त्याचा मुळींच पत्ता नव्हता ! भिडेकाकूंचं अन् तिच्या मावससासूचं नातं त्याच्या बहिणीनं त्याला समजून सांगितलं तरी भिडेकाकू कोण तें त्याच्या लक्षांत आलं नाहीं ! तो म्हणाला, " बरं असतील."

" त्यांची तारा पाहिली नाहींस तूं ! आपल्याकडच्या लग्नाला आली आहे. दिसली नाहीं तुला ?"

शामराव मनाशीं म्हणाला, " लग्नासाठीं जमलेल्या बायकांच्या घोळ-

त्याकडे पाहयची छाती कोण कशाला करील ! " पण मोठ्यांदा तो येवढचं म्हणाला, " नाहीं बुवा. "

" चांगली चुणचुणीत आहे बघ दिसायला ! "

" असेल. पण तिचा अन् माझ्या उद्यां जाण्याचा काय संबंध आहे तें अजून कळलं नाहीं मला. "

" सांगतें. ती मुंबईहून आली होती. तिला परत जायचं आहे. ती आज निघूं शकत नाहीं. तुझ्या सोबतीनं ती जाईल असा मीं बेत केला होता. वेळच आली तर ती एकटीसुद्धां जाईल म्हणा, पण अनायासं तूं जायचाच आहेस, तेव्हां तुझी सोबत तिला मिळाली तर बरं. रेलवेच्या प्रवासाचं येवढं नाहीं; पण बोरीबंदरावरनं गाडी करून गिरगांवांत जायचं म्हणजे एकट्या मुलीला भीति वाटते. त्यांतून हिंदूमुसलमानांचा दंगा..."

" आलं, आलं लक्षांत. " शामराव म्हणाला.

आपल्या वहिणीला आजच येवढा प्रेमाचा उमाळा कां आला तेंहि आतां त्याच्या लक्षांत आलं होतं. तिनं आनंदानं विचारलं,

" मग उद्यां जायचं कबूल करतोसना ? "

" हं. "

या एकाक्षरी रुकारांत जो नाखुषीचा ध्वनि होता तो शामरावाच्या वहिणीच्या लक्षांत आला नाहीं; पण तो त्याच्या उद्‌गारांत होता खास. भिडेकाकूंच्या ताराला नेण्याच्या जबाबदारीचं लचांड कशाला आपण गळ्यांत घेतलं असं त्याला मनांतल्या मनांत वाटत होतं.

मात्र दुसऱ्या दिवशीं एक्सप्रेसच्या गर्दींत मोठ्या प्रयासानं एक बाक गाठून, ताराला नीट जागा देऊन तो जेव्हां त्या छोट्या बाकावर शक्य तितकं तिच्यापासून दूर बसला, तेव्हां त्याला तसं वाटेनासं झालं. कारण एक तर त्यानं पांहिलं, भिडेकाकूंच्या ताराची जी त्यानं कल्पना केली होती त्या कल्पनेहून ती अगदींच निराळी होती. त्याच्या वहिणीनं सांगितल्याप्रमाणं नुसती चुणचुणीतच नव्हे तर चांगली देखणी होती ती ! अन् शिवाय त्याला जें वाटलं होतं कीं, अगदी जुन्या थाटाच्या, लाजऱ्या,

मुखस्तंभ अशा एका मुलीला बरोबर नेण्याचा चमत्कारिक प्रसंग आपल्यां-वर येणार, तेंहि खोटं ठरलं होतं. त्यानं जेव्हां जेव्हां तिला कांहीं प्रश्न केले, तेव्हां तिनं न लाजतां अगर न गांगरतां उत्तरं दिलीं होतीं. एकदोनदां बोलतांबोलतां तिनं मोठं गोड हास्यहि पण केलं होतं. आणि त्याचे प्रश्न संपले व त्यामुळं आपलें संभाषण बंद पडणार असं वाटल्याबरोबर तिनं आपण होऊन त्याला कांहीं प्रश्न करून बोलण्याचा ओघ चालू ठेविला होता. गाडींत जागा धरायच्या वेळीं तर एखाद्या अजागळ मुलीप्रमाण न वागता तिनं हमालाच्या हातांतला शामरावाचा बिछाना झटकन् घेऊन बाकावरच्या दोन्ही जागा अडवून टाकण्याची हुषारी दाखविली होती आणि डब्यांतली गर्दी पाहून तो जेव्हां तिला म्हणाला, कीं " बायकांच्या डब्यांत पुष्कळ जागा आहे. तिकडे बसतां का तुम्ही ? " तेव्हा ती हंसत म्हणाली होती,

" नको. जागेपेक्षां सोबतच जास्त महत्त्वाची नाहीं का ? "

गाडी सुरू झाल्यावर शामराव बॅगमधलं एक पुस्तक काढून वाचूं लागला. म्हणजे मधूनच चार ओळी वाचाव्या, मधूनच पुस्तक आड धरून तिरप्या नजरेनं ताराकडे तिरखून पाहावं, असं करूं लागला. तारा खिडकीशीं बसून बाहेरचा देखावा पहात होती. मधेंच त्यानं विचारलं, " तुम्हांला देऊं का कांहीं वाचायला ! ', तेव्हां ती म्हणाली, " नको ! "

त्याला जरासं आश्चर्य वाटलं. गाडींत बसून प्रवास करायच्या वेळीं माण-साला काय मिळेल तें वाचायचा चाळा बरा वाटतो अशी त्याची कल्पना होती. पण ही तारा त्याच्या कल्पनेला अपवाद ठरली. त्यानं जरा वेळानं पाहिलं तों बाहेरचा देखावा पाहण्यांत ती अगदीं मग्न झाली होती. जणूं सृष्टिशोभेचा ती अगदीं अभ्यास करीत होती.

मधेंच आपल्या हातांतल्या पुस्तकांतलं एक चित्र पुढं करून त्यानं तिला म्हटलं— " हें पाहिलंत का ? "

तिनं तें पाहून परत देतांदेतां म्हटलं, " छान आहे. पण—"

" पण काय ? "

" काहीं नाहीं." असं म्हणून ती स्वतःशींच थोडी हसली असा शामरावाला संशय आला.

त्यानं विचारलं, " कांहीं नाहीं कसं ? कांहींतरी आहे. सांगा ! "

" फोटोवरून तयार केलेलं आहे तें चित्र. अशा चित्राची किंमत फारशी समजत नाहींत."

" मला त्यांतलं कांहींच कळत नाहीं. तुमचा बराच अभ्यास दिसतो या बाबतींत ! "

पुन्हां ती मघाप्रमाणंच हसली व म्हणाली, " हो, आहे थोडाबहुत. "

" तो कसा ? "

" माझे वडील चित्रकार होते. "

" मग तुम्ही कां होत नाहीं ? "

" होणार आहे. "

" म्हणजे ? "

" आर्ट स्कूलमध्यें शेवटच्या वर्षांत आहें मी. वास्तविक आमच्या गरिबीमुळं माझं शिकणं होणं कठीणच होतं; पण मला फ्रीशिप मिळाली अन् सारं जमलं. "

" अस्सं. "

तिच्या घरची आणखी माहिती विचारावी असं शामरावाच्या मनात आलं; पण तें बरं दिसणार नाहीं असं वाटून तो गप्प बसला. गाडी घाटाखालीं उतरत होती त्यामुळं बाहेरचं निसर्गसौंदर्य न्याहाळण्यात तारा पुन्हा गर्क झाली. संभाषणाचा ओघ थांबला.

पण कांहीं वेळानं शामरावानं चहा मागविला तेव्हां तो घेतांघेतां दोघांचं संभाषण पुन्हा चालू झालं. शामराव म्हणाला,

" चहा अगदीं रद्दी आहे, नाहीं ? "

" कां ? बरा आहे कीं. "

" गोड नाहीं लागत जास्ती तुम्हांला ? "

" त्याचं असं आहे, मला चहाचं इतकं वेड आहे कीं, तो कसलाहि असला तरी चालतो मला. इतका चहा पिणं बरं नाहीं म्हणून आमची आई सारखं बोलत असते मला, अन् मी तासातासानं चहा करून पीत असतें !"

" आईशिवाय दुसरं कुणी रागं भरणारं नाहीं वाटतं तुम्हांला ? " शामरावानं धूर्तपणानं प्रश्न केला.

" दुसरं कोण बोलणार मला ? आमच्या घरांत आई अन् मी—दोघीच ! "

" अस्सं. "

" तुम्ही डॉक्टर आहांत म्हणून विचारतें, खरंच का हो चहानं अपाय होतो प्रकृतीला ?"

तिची चेष्टा करायसाठीं शामरावानं गंभीर चर्या केली अन् म्हटलं,

" डॉक्टर कधीं फुकट सल्ला देत नाहीं. "

तारा हसली, पण हार न खातां म्हणाली,

" बरं, फी देऊन विचारीन. "

" पण तें विचारायला दवाखान्यांत आलं पाहिजे. "

" मग येईन कीं. त्यांत काय मोठंसं ? "

" नको नको. " शामराव हसून म्हणाला, " ओळखीच्या पेशंटला जरा सवलती दिल्या पाहिजेत. तुमची हरकत नसेल तर मीच येईन तुमच्या घरीं. म्हणजे तुमच्या हातचा चहा मिळेल आम्हांला, अन् कशा तऱ्हेचा चहा तुम्ही पितां तें समजून त्यानं प्रकृतीला अपाय होईल कीं काय तेंहि सांगतां येईल. "

" वा, फार छान ! डॉक्टर इतके सहृदय असतात अशी कल्पना नव्हती माझी ! मग ठरलं तर. केव्हां येणार आमच्याकडे चहाला ? "

" केव्हांहि. "

" येत्या रविवारीं ? "

" हूं. "

" सकाळीं ? वेळ होईल का तुम्हांला ? "

शामराव मनाशीं म्हणाला, " मला उद्योग काय आहे ! " पण उघडपणें त्यानं उत्तर दिलं, " काढूं वेळ थोडासा. "

आणि तो मग रविवारीं ताराच्या घरीं चहाला जाऊनच थांबला नाहीं, तर त्यानंतरहि तो वारंवार तिच्या भेटीला जाऊं लागला. पुण्यापासून मुंबईपर्यंतच्या एकत्र प्रवासाचा दोघांच्या आयुष्यांवर कायमचा परिणाम होणार असं उघड उघड दिसूं लागलं.

परंतु आपलं मन तारावर जडलं आहे अन् तिचंहि प्रेम आपल्यावर बसलं आहे हें जों जों शामरावाच्या अधिकाधिक लक्षांत येऊं लागलं, तों तों त्या वाढत्या प्रीतीचं त्याला एक प्रकारचं भयहि वाटूं लागलं. तिच्याकडे गेल्यावांचून त्याच्या जिवाला रहावत नसे, म्हणून तो रोज तिच्या घरीं जाई. तिला पाहतांच त्याला विलक्षण आनंद होई व तो त्यांच्या मधुर भाषणांत व्यक्त होई. आणि तिचं बोलणं हसणं ऐकलं कीं, त्याला रोमांचकारी समाधानाचा अनुभव येई. परंतु या साऱ्या गोष्टी होत असतां एकीकडे त्याला वाटे -छे, हें सारं बंद केलं पाहिजे. ही प्रीति वाढूं देतां कामा नये ! हिच्यावर आपलं कितीहि प्रेम असलं तरी हिच्याशीं आपलं लग्न होणं शक्य नाहीं...

आपल्या वडिलांना ऋणमुक्त करणं आपलं कर्तव्य आहे. त्यासाठीं या विचित्र समाजरचनेंत लग्नाच्या बाजारांत काय जी किंमत तरुण पुरुषांना दिली जाते ती वसूल करून घेण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. आणि ताराशीं लग्न करण्यांत ती मुळींच वसूल होण्यासारखी नाहीं !...

तारा सुंदर असेल, हुषार असेल; उद्योगी, महत्वाकांक्षी, निर्भय असेल; तिचं आपल्यावर प्रेम असेल; पण तिच्या दारिद्र्यापुढं या साऱ्या गुणांची किंमत शून्य ठरण्यासारखी समाजरचना आहे; अन् एकादा मजूर अपघातानं यंत्राच्या पट्ट्यांत सापडल्यावर त्याला निसटतां येऊं नये, तद्वत् या दुष्ट समाजरचनेच्या फेऱ्यांत आपण सापडलों आहोंत !...

आजपर्यंत धंद्याच्या बाबतींतच काय तो समाजरचनेचा जाच शाम·

रावाला जाणवला होता. समाजरचना विकृत असली, श्रीमंत अन् गरीब असे वर्ग त्या रचनेनं पडले असले, कीं माणसाला केवळ गुणांच्या जोरावर जगतां येत नाहीं येवढंच त्याला पुरतं कळलं होतं. पण आतां आणखी एक कटु सत्य त्याला कळूं लागलं. खाजगी मालमत्तेच्या तत्त्वाचं विष समाजरचनेंत भिनलेलं असलं कीं केवळ पैसाच नव्हे, तर प्रीतिसुद्धां माणसाला मिळवितां येत नाहीं !...

आपलं व समाजरचनेचं शत्रुत्व असं अगदीं हृदयापर्यंत येऊन भिडेल अशी त्याला कल्पना नव्हती. त्यामुळं तें शत्रुत्व अनुभवाला आल्याबरोबर तो गांगरून गेला, चिडला ! ताराला अगदीं हृदयाशीं घट्ट धरायला तो अधीर झाला होता; पण समाजरचना त्याला ओरबाडून दूर ओढीत होती ! त्या रचनेशीं कसं लढावं त्याला समजेना ! धंद्याच्या बाबतींत लबाडीचं हत्यार त्याच्या उपयोगीं पडलं होतं; पण या बाबतींत लबाडीचा काय उपयोग होता ? लबाडी करायची झाली तरी ती करायची कशी ? त्याला कांहींच कळेना ! तो अगदीं निराश होऊं लागला...

पण तो अशा प्रकारें आशा सोडण्याच्या बेतांत असतांना एके दिवशीं प्राणजीवन अमरसी पुन्हां त्याच्याकडे आला आणि त्याची एक कामगिरी आपण केली तर आपल्या आशेला संजीवन मिळेल असं त्याला वाटूं लागलं. प्राणजीवन जी कामगिरी घेऊन आला ती उघडउघड लबाडीची होती. इतकंच नव्हे, तर ती धोक्याचीहि होती. पण उलट, ती केली तर शामरावाला पांचसहा हजार रुपये मिळण्यासारखे होते. प्राणजीवन ज्या शेटजींचा मुनीम होता ते सट्ट्याच्या व्यापारांत डबघाईस आले होते आणि देणेदारांचं देणं चुकविण्यासाठीं जी युक्ति त्यांनीं योजली होती, त्यांत एका डॉक्टराचं साहाय्य त्यांना हवं होतं. त्यांना बायको नव्हती, पण काल्पनिक पत्नी निर्माण करून तिच्या नांवचा खूप मोठ्या रकमेचा विमा उतरून एक दोन हप्ते भरल्याबरोबर तिला मारून टाकण्याचा त्यांनीं बेत केला होता. हा प्रयोग करण्यासाठीं ज्या कंपनीला आपल्या खाजगी संसाराची माहिती असणं संभवनीय नाहीं अशी कंपनी निव-

डली पाहिजे हें ओळखून नुकतंच मुंबईस ऑफिस थाटून काम करूं लागलेल्या एका जर्मन विमाकंपनींत आपल्या काल्पनिक पत्नीचा विमा उतरायचं त्यांनीं ठरवलं होतं. आपला बेत त्यांनीं नीट आंखला होता. फक्त एका वस्ताद डॉक्टराचं सहकार्य त्यांना हवं होतं. असा डॉक्टर कसा मिळेल याचा विचार करतांकरतां प्राणजीवनला शामरावाची आठवण झाली होती आणि तो त्याच्या भेटीला आला होता. प्राणजीवनच्या शेठजींची गरज शामरावानें 'ओळखली', तर त्याच्या हातां पांचसहा हजार रुपये बक्षीस म्हणून देऊन त्याची मूठ दाबायची त्यांची तयारी होती. पण शामरावाच्या मनाची तयारी होणं सोपं नव्हतं.

विकृत समाजरचनेचे आघात परतविण्यासाठीं लबाडीच्या हत्याराचा प्रत्याघात केल्याशिवाय जीवनाच्या धडपडींत व्यक्तीला जगतां येणार नाहीं अशा भावनेनं मागं एकदा शामराव पापकृत्य करायला तयार झाला होता. पण तें काम न आताचं हें काम यांत फार अंतर होतं. तात्त्विक दृष्ट्या लबाडी सगळीच सारखी खरी, पण ती करणाऱ्याला सहसा तसं वाटत नाहीं. लबाडीनं पन्नास रुपये मिळवितांना शामराव फारसा कचरला नव्हता. आतां लबाडी करून पांचसहा हजार रुपये मिळवायचे म्हटल्यावर त्याला धीर होईना. त्याचं मन हेलकावे खाऊं लागलं. लबाडी केली नाहीं तर ताराची प्राप्ति अशक्य होती. उलट तिच्या प्राप्तीसाठीं पापकृत्य करावं असा निश्चय सहजासहजीं करण्यासारखा नव्हता. काय करावं तें शामरावला समजेना ! रात्रंदिवस तो विचार करूं लागला. त्या विचाराचा शीणहि त्याला सहन करवेना. ताराच्या भेटीला जायचंहि तो एखादे दिवशीं टाळूं लागला. ती भेटल्यावर तिच्याशीं नेहमीच्या उल्हसित वृत्तीनं बोलणंचालणं त्याला अगदीं जमेना. त्याला त्या एकंदर घटनेचा ताण असह्य वाटूं लागला.

अखेर एके दिवशीं त्यानं या अनिश्चिततेचा शेवट केला.

आणि मग त्यानं आपल्या वडिलांना पत्र पाठविलं. त्यांत लिहिलं—

"...पण माझ्या पसंतीची मुलगी पाहून मी लग्न करणार तेव्हां

तुमच्या डोक्यावरचा कर्जाचा भार तसाच कायम राहणार असं तुम्हांला भय वाटायचं कारण नाहीं. तुम्हांला पांच हजार रुपये देऊन तुमची चिंता दूर करतां येणं मला शक्य आहे. एका लक्षाधीश व्यापाऱ्याच्या पत्नीची केस माझ्या हातांत होती. माझ्या कामगिरीवर खूष होऊन त्यांनीं मला पांच हजार रुपये बक्षीस दिले आहेत..."

हें पत्र वाचून शामरावांच्या वडिलांना अर्थातच फार आनंद झाला. ते ज्याच्या त्याच्याजवळ म्हणूं लागले, "नाहींतरी मी पहिल्यापासून म्हणतच होतों, कीं आमचा शामू हुषार आहे. आज नाहीं उद्यां तो मुंबईच्या देशमुखांच्या तोडीचा डॉक्टर ठरेल!"

ताराजवळ जेव्हा शामरावानं लग्नाची गोष्ट काढली तेव्हां मनांतला अत्यानंद लपवून ती म्हणाली,

"पण माझ्यासारखी गरीब मुलगी कशी चालेल तुम्हांला? मीं तर पुण्यास ऐकलं होतं, कीं तुमच्या लग्नाच्या वेळीं पांच हजार रुपये हुंडा मागायचा निश्चय आहे तुमच्या वडिलांचा!"

"असं? म्हणजे तूं पुण्यास आली होतीस तेव्हांच आपलं लग्न जुळेल कीं नाहीं याचा अदमास घेत होतीस वाटतं? चरीच पाताळयंत्री आहेस कीं!" असं म्हणून शामराव हसला. ताराहि मनःपूर्वक हसली.

मात्र शामराव जरी हसत असला, तरी त्याच्या चेहेऱ्यावर कसल्या तरी गंभीर विचाराची सूक्ष्म छाया पसरल्याचा तिला सारखा संशय येत होता. पहिल्या एकान्ताच्या घटकेंत सुद्धा तो संशय तिला दूर करतां आला नाहीं.

कारण खरोखरच ज्या गंभीर, गहन प्रश्नानं शामरावाच्या चर्येवरची ती कृष्णछटा निर्माण केली होती त्या प्रश्नाचं उत्तर सहज अगर लवकर सांपडण्यासारखं नव्हतं. त्याच्या मनांत राहून राहून येई, लढाईत आणि लग्नांत असत्याचा आश्रय केला तरी तो क्षम्य असतो खरा, पण सामान्य दृष्टीनं पाहिलं, तर माझं वर्तन पापाच्याच सदरांत पडेलना? पण लगेच

त्याच्या मनांत असंहि येई, कीं मला पापी ठरविल्यानं ज्यांतून माझं पाप निर्माण झालं तो समाजरचनेचा प्रश्न सुटतो का ?...

मग त्याला वाटे, आपल्या लग्नाची ही समग्र हकीकत कोणाला तरी सांगावी. निदान तारापासून तरी ती लपवून ठेवूं नये.

पण तसा धीर त्याला कांहीं केल्या होईना. तो फक्त तिला संदिग्धपणें कधीं कधीं म्हणे, "तुझं माहेरचं नांव मीं तुला कां बदलून दिलं नाहीं, माहीत आहे का ?"

"कां ?"

"तूं खरंच माझी तारका आहेस ! अंधारांत एकदम तारका प्रगट व्हावी तशीच तूं माझ्या..."

"असं असं ! पण असा कसला अंधार पसरला होता तुमच्या दृष्टीपुढं ?"

यावर तो प्रश्न टाळून तो हसत म्हणे, "वा, उपमा म्हटली कीं ती अगदीं पूर्णोपमा करून दाखविली पाहिजे वाटतं ! शहाणीच आहेस ?"